# पद्मा

गोपाल नीलकण्ठ दाण्डेकर



मॅजेस्टिक बुक स्टॉल

मूल्य पावणेचार रुपये

द्वितीयावृत्ति
विजयादशमी १८[illegible]

मुखपृष्ठ
राम वाईरकर

प्रकाशक
केशव कोठावळे
मॅजेस्टिक बुक स्टॉल
गिरगांव नाका, मुंबई ४

मुद्रक
य. गो. जोशी
आनंद मुद्रणालय
१५२३ सदाशिव
पुणे २

प्रिय नाना देशमुख

आणि

अण्णा बेहरकर

या दोघांस—

आप्पा दाण्डेकर

# एक

"सर्वेश्वर ! तूं दयाळु आहेस ! माझ्या मनांतील भाव तुला कळतात ! तुझ्यापाशीं याचना केल्यावर कोणाचेही मनोरथ अपूर्ण राहात नाहींत.

"भगवन् ! तूं वाटेल तें देण्यास समर्थ आहेस. तुझ्या कृपेनें मुके बृहस्पतीला लाजविणारें पांडित्य प्रगट करतात. पंगू तुझ्या कृपेच्या सामर्थ्यानें वायूशींही स्पर्धा करतात. तुझी कृपा झाली असतां शूलांस पल्लव फुटतात. मृतांस पुनः चिरंजीव करण्याचें सामर्थ्य तुझ्या कृपेंत आहे.

"जगन्नाथा ! तूं जगाचा नाथ आहेस. मग मीच एकटा तुझ्या अवकृपेस कां पात्र झालों ? कीं तुझ्या कृपाकटाक्षानें पुनीत होणाऱ्या जगांत माझा अन्तर्भाव होतच नाहीं ?

"प्रभो ! मी जी याचना करीत आहें, ती कधींच पूर्ण होणार नाहीं का ? तुझ्या दारांतून हा याचक विन्मुखच परत जाणार काय ?

"जगत्पते ! करुणा कर ! माझी वांछित वस्तु मला दे. तुझ्याच दयेच्या आधारावर मी जगत आहें. अनाथांच्या नाथा ! तुझ्यावर अवलंबून जगणाऱ्या या एकाचें जीवित असेंच विफल होणार काय ?"

"नाहीं !" गंभीर ध्वनि उमटला.

प्रार्थना करणारा आपल्या समाधींतून जागा होऊन मागें वळून पहात बोलला,

"मग साफल्याचा अरुणोदय केव्हां होईल ?"

"ज्या प्रसादाची तूं इच्छा करीत आहेस त्याचा त्याग करण्याइतकें मनोधैर्य तुझ्या ठायीं निर्माण होईल तेव्हां."

"पण प्रभु ! अप्राप्त वस्तूचा त्याग कसा संभवूं शकेल ?"

"त्यागाची सिद्धता झाल्यावर कांहींही अप्राप्त रहाणार नाहीं."

मुखावर खिन्नतेची छटा पसरत देवशर्मा म्हणाले,

"वांछित वस्तु मिळण्यास तिचा त्याग करण्यापलीकडे दुसरा उपाय नाहीं काय ?"

" नाहीं. महन्त त्या विस्तीर्ण सभामंडपांत एका बाजूस मांडलेल्या आपल्या व्याघ्रासनावर बसत बोलले. " देवशर्मा, तूं ज्या वस्तूची कामना करीत आहेस, तीहून अत्यंत श्रेष्ठ असलेलें अमृतत्व मिळविण्याचाहि त्याग हा एकच उपाय आहे, असें शास्त्रवचन तुला माहीत असून तूं प्राकृत अज्ञ मनुष्यासारखे प्रश्न कां करीत आहेस ? "

उदास होऊन देवशर्मा परत फिरले. ते त्या जगन्नाथाच्या अतिप्रचंड सभामंडपांतून बाहेर पडले. वाटेंत असलेलीं पुष्पांची दुकानें उघडून नुकतेंच माळी नानाविध सुगंधी पुष्पांच्या हारांनीं ती सजवूं लागले होते. कर्पूर, धूप आदि सुगंधी वस्तूंचीं दुकानेंही उघडलीं जाऊन त्यांच्या मनोहारि सुगंधानें आसमंतांतील वातावरण प्रसन्न झालें होतें.

सूर्योदय व्हावयास आल्यानें जगन्नाथाचे भक्त आणि यात्रेकरू स्नानें उरकून देवदर्शनाकरितां मंदिराच्या विस्तीर्ण प्राकारांत प्रवेश करीत होते. त्या यात्रेकरूंत स्त्रिया होत्या, तसे पुरुषही होते. वृद्ध होते, तरुणही होते. बराच लांबचा प्रवास करून आल्यामुळें मलूल दिसणारी तीं माणसें देवदर्शनाचा समय जवळ आल्यानें प्रसन्न झाली होतीं.

त्या यात्रेकरूंच्या समूहांत दरिद्रीही होते, संपन्नही होते. पण देवमंदिरांत तो भेद मावळला होता. श्रीमंत पुरुष आपलीं रेशमी जरीकांठीं अंगवस्त्रें सांभाळीत त्या गर्दींतून पुढें शिरत होते, तर त्यांच्या स्त्रिया भरजरी महावस्त्रें लेऊन कंचुकींवरून घेतलेलीं तलम रेशमी उत्तरीयें सांवरीत त्यांचें अनुकरण करीत होत्या. त्यांच्या हातीं असलेल्या उंची हारांतील फुलें गळून पडून खालीं पुष्पशय्या झाली होती. त्या पायदळीं कुस्करणाऱ्या पुष्पांची चिंता न करतां देवदर्शनाच्या लालसेनें तो समूह पुढें सरत होता.

परंतु भोंवतालीं एवढा कोलाहल असूनही त्याचा यत्किंचित् प्रतिध्वनि देवशर्म्यांच्या उदास मनावर उमटला नाहीं. ते मान खालीं घालून जगन्नाथ-मंदिराच्या प्राकारांतून बाहेर पडले, आणि आपल्या घराकडे वळले.

जगन्नाथपुरी त्या वेळीं आपल्या संपूर्ण वैभवांत नांदत होती. वंगाधिप महाराज भद्रसेनांच्या अधिपत्याखालीं वंग आणि उत्कल हे दोन्ही प्रान्त मोठ्या भरभराटींत होते. पर्जन्य वेळच्यावेळीं पडत होता. पृथ्वी अमाप पीक प्रसवत होती. चोर-दरवडेखोरांच्या गोष्टी केवळ वृद्धांच्या तोंडूनच ऐकूं येत.

व्यापारही मोठ्या प्रमाणांत चालत असे. भारताच्या पूर्वेस असलेल्या द्वीप-समूहांशीं देवघेव करणाऱ्या श्रीमंत धनिकांनी सगळी सागरतटाकीची नगरें गजबजून गेलीं होतीं.

जगन्नाथपुरी हें क्षेत्रस्थान असल्यामुळें तिथें अनेक श्रद्धाळू श्रीमंत कुटुंबें नित्य देवदर्शन घडावें या लालसेनें मधून मधून येऊन रहात असत. त्यांनीं पुरींत मोटमोठे प्रासाद आणि अट्टालिका बांधून ठेवल्या होत्या. पुरीमध्यें पौरोहित्य करणारे पुरोहितहि या श्रीमंतांची यजमानकृत्यें करून चांगले धनिक झाले होते. त्यांचीं घरें पुरीची शोभावृद्धीच करीत होतीं.

देवशर्मा मार्गांत असलेल्या गर्दीकडे यत्किंचित्‌ही लक्ष न देतां हळू-हळू एका भव्य प्रासादांत शिरले. ते आंत शिरतांक्षणींच द्वारांत बसलेलीं माणसें उठून उभीं राहिलीं. प्रहरींनी आपलीं शस्त्रें उगीचच सांवरलीं, लेखनिकांनी खाली वांकून देवशर्म्यांस नमस्कार केले. आश्रितांनीही त्यांचेंच अनुकरण केलें.

पण यांपैकीं कोणाकडेही लक्ष न देतां देवशर्मा गृहाच्या अन्तर्भागांत गेले, आणि आपल्या शय्यागारांत शिरले. तें शय्यागार कांचेचे लोलक लाविलेल्या नानाविध दीपकांनी सुशोभित केलें होतें. आदल्या दिवशी रात्री शय्यागृहांत जाळलेल्या चंदनाचा आणि अगरूचा मंद सुगंध तिथें अजून रेंगाळत होता. देवशर्म्यांचा मंचक भरजरी कलाबतूनें काम केलेल्या वस्त्रांनीं सजविलेला होता. त्या मंचकाशेजारींच एक दुसरें काष्ठासन ठेविलें असून त्यावर एक मृगचर्म अंथरलें होतें.

देवशर्मा आंत आल्यावर त्यांनीं अंगावरील उत्तरीय आपल्या मंचकावर भिरकावून दिलें, आणि ते धप्पदिशीं त्या काष्ठासनावर बसले.

त्यांच्या या अप्रसन्नतेचें कारणही तसेंच हृदयस्पर्शी होतें

देवशर्मा हे जगन्नाथपुरीशेजारील विष्णुपुरी या गांवचे स्वामी होते. त्या गांवचें स्वामित्व त्यांच्या वंशाकडे येऊन पांच पिढ्या होऊन गेल्या होत्या. योगायोग असा कीं, या पांचही पिढ्यांत उत्तराधिकारी म्हणून एकच वंशज शिल्लक रहात असे. देवशर्म्यांचे पणजोबा, आजोबा, वडील हे सर्व एकुलतेच पुत्र होते.

देवशर्म्यांच्या ज्या पूर्वजास विष्णुपुरीचें स्वामित्व प्राप्त झालें होतें, त्यास

एका साधूनें असें भविष्य कथन केलें होतें, कीं "तुझ्या ज्या पिढीस निपुत्रिकत्व प्राप्त होइल, त्याच पिढींत तुझ्या वंशापासून विष्णुपुरीचें स्वामित्व हरण केलें जाईल."

सध्यां देवशर्म्यांना त्रेपन्नावें वर्ष सुरू झालें असूनही अजून त्यांच्या घरीं पाळणा हलला नव्हता. यामुळें त्या साधूनें वर्तविलेलें भविष्य आपल्याच देखत-डोळां खरें टरतें कीं काय, या चिंतेनें देवशर्म्यांच्या अंतःकरणांत घर केलें होतें.

देवशर्म्यांचा प्रथम विवाह झाला, तो त्यांचे वयाचे सातवे वर्षी. त्यांची प्रथम पत्नी रेणुका ही त्यावेळीं चार वर्षें वयाची होती. देवशर्मा खेळ खेळतांना तिला मारूं लागले, कीं ती त्यांना बोचकारीत असे, आणि एकदां देवशर्म्यांनीं तिला खूपच त्रास दिल्यावर ती त्यांच्या हाताला कडकडून चावली. या बालपणीच्या दोन गोष्टींकडे दुर्लक्ष केलें, तर मोठेपणीं रेणुका मोठी आदर्श पत्नी होती, यांत शंका नाहीं.

तिचा स्वभाव अत्यंत शांत आणि निगर्वी होता. आश्रित जनांना रेणुका आईप्रमाणें वागवीत असे. घरीं येणाऱ्या प्रत्येक माणसाचें यथोचित स्वागत करण्यांत ती अत्यंत प्रवीण होती. रेणुका माहेरीं गेली, कीं एवढें मोठें देवशर्म्यांचें भरलेलें घरही अगदीं सुनें दिसायचें.

दिसायला जरी रेणुका मोठी सुंदर नसली—तिचें वर्णन करतांना कवीला जरी चंपक, तोंडलें, कुंदकळ्या, भ्रमर, गजगती, हरिणाचे अक्ष, या उपमा न सुचल्या तरी तिच्या मधुर स्वभावानें या सर्व वस्तूंची उणीव भरून काढली होती.

पण जसजशीं वर्षें लोटूं लागली आणि रेणुकेला संतान होण्याचें लक्षण दिसेना, तसतशी घरांतील सर्वच माणसांची अस्वस्थता वाढूं लागली. देवशर्म्यांची माता आणि पिता हे देवशर्मा दहा वर्षांचे असतांच त्यांच्या शिरावर विष्णु-पुरीच्या स्वामित्वाचा भार देऊन निधन पावले होते. घरांत जरी दुसरीं वडील माणसें होतीं, तरी अगदीं जवळचें असें कुणीही नव्हतें. म्हणून मुख्यतः संतानहीनतेमुळें होणारा मनस्ताप जर कोणाला जाणवत असेल तर तो रेणुकेलाच.

वयाची तिशी उलटूनही जेव्हां संतान होण्याचीं चिन्हें दृष्टोत्पत्तीस येईनात, तेव्हां एके दिवशीं रात्रीं ती मनाचा निर्धार करून देवशर्म्यांस म्हणाली,

" ऐकलेंस ? "

" काय म्हणत्येस ? "

" अजून कांहीं वेळ गेली नाहीं. "

" कसली ? "

" दुसरी कसली ? यंदा मला एकतिसावें सरून बत्तिसावें वर्ष लागेल. ईश्वराच्या मनांत मला संतति व्हावी असें कांहीं दिसत नाहीं—"

" वा: ! " देवशर्मा हंसून म्हणाले, " तूं फार लवकर निराश झालीस ! "

" तसें नव्हे. पण—"

" पण काय ? "

" आपल्या पूर्वजांस एका साधूनें सांगितलेलें भविष्य स्मरणांत आहे ना ? "

एका क्षणांत मनाच्या तळाशीं दडून असलेली भीति विषण्णतेच्या रंगांत आपला कुंचला बुडवून देवशर्म्यांच्या प्रसन्न मुखावर एक अस्पष्ट छटा उमटून गेली. प्रयत्नपूर्वक ती भीतीची चित्रकला पुसून टाकीत परत बळेंच हंसत देवशर्मा म्हणाले,

" पण तूं कांहीं अजून म्हातारी झाली नाहींस ! "

आपल्या उत्तरीयाशीं चाळा करीत रेणुका म्हणाली,

" म्हातारी नाही झाल्यें तर काय ? घरांतलीं बहुतेक माणसें मला मातुश्री म्हणतात. एवढ्या मोटमोठ्या माणसांची मातुश्री म्हातारी नाहीं तर काय बाला असते ? "

तिच्या या बोलण्यावर प्रसन्न होत देवशर्मा म्हणाले,

" तर मग तुला मुलें झालीं आहेत म्हणायची ! मग मुलांची इच्छा कशाला करत्येस ? "

" आपणांसाठीं. लोक मला जरी मातुश्री म्हणत असले, तरी ते कांहीं आपणांस तात म्हणत नाहींत. आपणांस पुत्र झालाच पाहिजे. "

" आतां काय करूं म्हणजे मला पुत्र होईल ? "

एक क्षण रेणुका थांबली. तिच्या मुखावर कृष्णछटा आपलीं पदचिन्हें रेखून गेली. पण दुसऱ्या क्षणीं पूर्वस्थितीवर येत ती म्हणाली,

" तेंच म्हणत होत्यें मी. आपण अजून तरुणच अहांत. "

" तूं म्हणत्येस म्हणून ही गोष्ट मी मान्य करतों. मग आतां मी काय करूं ? "

"आपण दुसरा विवाह करा!"

देवशर्मा आश्चर्यानें दिङ्मूढ झाले. आश्चर्याचा भर ओसरल्यावर ते म्हणाले,

"छे छे! भलतेंच कांहीं बोलूं नकोस! तूं जर असें कांहीं सांगून माझ्या मनास पीडा देणार असशील, तर मी उद्यांच संन्यास घेईन! जळो तें विष्णुपुरीचें स्वामित्व! मला त्यांच्याशीं मुळीच कर्तव्य नाहीं. तुझें माझें लग्न होऊन आज अठ्ठावीस वर्षे व्हायला आलीं. इतक्या वर्षांतही जर तुला माझी ओळख पटली नसेल, तर मी दुर्दैवीच म्हणायचा!"

"मी आपलें अंतःकरण पूर्णपणें ओळखलें आहे, आणि म्हणून मी आपणांस विवाहाचा आग्रह करीत आहें. आपल्या पदरीं पडून मी किती मोठी भाग्यवान् झालें आहें, याची कदाचित् आपणांसही कल्पना नसेल. इतकीं वर्षे झाली, मला संतान झालें नाहीं, पण आपण कधीं मुखावाटें एका शब्दानेंही त्याचा उच्चार केला नाही! आपल्या अंतरांतील व्यथा आपण एवढीशीही बाहेर दिसूं दिली नाही. एवढें मोठें अंतःकरण घेऊन आपण जन्माला आलांत! मी आपणांला निपुत्रिक राहूं द्यायची नाहीं! त्या लोकापवादापासून मी माझें सर्वस्व खर्चीं घालून आपलें रक्षण करीन."

बोलतां बोलतां रेणुकेच्या नेत्रांतून अश्रुप्रवाह सुरू झाला. आपल्या अंगवस्त्रानें ते अश्रु पुसून तिचें मुख उचलीत देवशर्मा प्रेमभरानें म्हणाले,

"मी निपुत्रिक राहिलों, तर तुला काय वाटल?"

"जन्मभर माझ्या मनास अत्यंत दारुण वेदनांच्या इंगळ्या दंश करीत राहतील!"

"पण द्वितीय विवाह करूनही मी निपुत्रिकच राहिलों तर?"

"भलतें सलतें बोलूं नये! आपल्यासारख्या सद्गुणी माणसास जर सर्वेश्वरानें एवढी मोठी शिक्षा केली, तर त्याच्या घरीं न्यायच उरला नाहीं असें मी म्हणेन."

"पण द्वितीय विवाह केल्यावर मी त्या पत्नीच्या मोहपाशांत गुरफटून तुजकडे दुर्लक्ष करूं लागलों तर?"

"तेंच मला व्हायला हवें आहे. मी घरची कामारी दासी बनून आपणां दोघांची सेवा करीत राहीन. आपल्या दृष्टीसही पडणार नाहीं. हळूंहळूं या

आपल्या विशाल प्रपंचांत अशी एकरूप होऊन जाईन, कीं आपणांस वेगळी अशी कुठें सांपडणारच्च नाहीं!"

"मग मी दुसरा विवाह मुळींच करणार नाहीं!"

प्रेमभरानें देवशर्म्यांच्या छातीवरील पुष्पमालेशीं खेळत रेणुका म्हणाली,

"असें काय करावें बरें माणसानें? सांगितलेलें मुळींच ऐकूं नये म्हणजे काय?"

"बरें. आतां ऐकेन. पण ती दुसरी पत्नी जर भांडखोर निघाली तर?"

"असेना कां! मी मुळीं भांडायला उभी रहाणारच्च नाहीं! जिथें तृणच्च नाहीं, तिथें अग्नि काय करूं शकेल?"

"पहा बरें! विवाह झाल्यावर सगळ्या बऱ्यावाइटाचें उत्तरदायित्व तुझ्यावर आहे!"

"असूं दे! अठ्ठावीस वर्षें आपल्या चरणांची सेवा करून मी तेवढें उत्तरदायित्व सांभाळण्यास समर्थ झाल्यें आहें!"

लगेच्च एक देखणी मुलगी पाहून रेणुकेनें देवशर्म्यांचा विवाह करून दिला. देखणेपणाबरोबर माहेरच्या श्रीमंतीचा अहंकार बरोबर घेऊन ज्या दिवशीं अम्बिकेनें देवशर्म्यांच्या घरांत प्रवेश केला, त्या दिवसापासूनच त्या घरांतलें सुख व समाधान नष्ट झालें.

अम्बिका अहंकारी तर होतीच्च, पण त्याचबरोबर दुराग्रही आणि हट्टी देखील. पहिल्याच दिवशीं रात्री तिनें गाल फुगवून देवशर्म्यांस सांगितलें,

"मी तुमच्याशीं मुळींच बोलणार नाही!"

तिचें सुंदर रूप पाहून देवशर्मा तिच्यावर मोहित झाले होते. प्रथम प्रणय-प्रसंगांतला हा एक प्रवेश असेल, अशा कल्पनेनें ते तिचें मुख कुरवाळून तिला म्हणाले,

"महाराज्ञी या दासावर कां कोपल्या आहेत?"

त्यांना झिडकारीत अम्बिका म्हणाली,

"अशानें कांहीं मी वश व्हायची नाहीं!"

"मग श्रीमतींचा कृपाप्रसाद जेणें करून या दासानुदासावर होईल, असा कांहीं उपाय या दासास कथन करण्याइतका हा कृपाभाजन सेवक होण्याची शक्यता आहे काय?"

" त्या हडळीला हांकून दिल्याशिवाय मी तुमच्याशीं बोलणार नाहीं ! "

" कोणती हडळ ? "

" जी आज अठ्ठावीस वर्षें आपल्याला मोह पाडून आपल्या उशा-पायथ्याशीं नांदत्ये आहे ती ! "

देवशर्म्यांच्या प्रणयाची धुंदी खाडकन् उतरली. ते मागें सरत म्हणाले,

" तूं रेणुकेविषयीं बोलत आहेस काय ? "

" त्या जन्मदरिद्रेचें नांव मी घेणार नाहीं ! "

रेणुकेचें माहेर कांहीं एवढें संपत्तिमान नव्हतें, यावर हा टोमणा होता. तो घाव तसाच सहन करून देवशर्मा म्हणाले,

" तुझें लग्न होण्यास सर्वस्वी कारणीभूत रेणुकाच आहे, हें तुला माहीत आहे काय ? "

" ज्याला त्याला आपापल्या भाग्यानें योग्य तें स्थान मिळत असतें ! "

शय्येवरून खालीं उतरत देवशर्मा म्हणाले,

" तूं जेव्हां रेणुकेची क्षमा मागशील, तेव्हांच मी तुझें तोंड पाहीन ! "

असें बोलून ते सरळ आपल्या शय्यागारांत जाऊन पहुडले. पहिली रात्र दोघांनींही अशी व्यतीत केली.

जेव्हां रेणुकेला हा प्रकार कळला, तेव्हां घाबरून जाऊन तिनें देवशर्म्यांची खूप काकुळती केली. अम्बिकेलाही तिनें समजविण्याचा प्रयत्न केला. देवशर्मा जेव्हां अम्बिकेचें तोंडच पाहायची गोष्ट काढीनात, तेव्हां मग कांहीं दिवसांनीं ती थोडी मऊ आली, व देवशर्म्यांचें तिच्याशीं बोलणें सुरू झालें.

वर्ष झालें, दोन झालीं, तीन, चार, सहा, दहा वर्षें झालीं. तरी कांहीं देवशर्म्यांचें दैव उदयास येतां दिसेना. शेवटीं एक दिवस ते भोजन करीत असतां रेणुकेला म्हणाले,

" तूं आग्रह केलास, म्हणूनच मी हा विवाह केला. एऱ्हवीं असल्या पत्नीशीं प्राणान्त ओढवला असतांही मीं लग्न केलें नसतें. शेवटीं काय फळ मिळालें ? "

त्यांच्या पात्रांत मोदक वाढीत रेणुका म्हणाली,

" मी अजून निराश झाल्यें नाहीं ! "

" तर मग काय मला सत्तराव्या वर्षीं पुत्रलाभ होणार आहे ? "

" प्रभूच्या मनांत असेल तर तसेंही घडेल. "

" एवढी वाट पहाण्याचें सामर्थ्य माझ्यांत नाहीं. प्रतिदिवशीं सर्वसंग-परित्याग करण्याचे विचार माझ्या मनांत बळावत आहेत. "

" आपण आजही परिव्राजक होऊं शकतां. पण मग आपल्या शिरावर असलेलं पितृऋण कोण फेडील ? "

हताश होऊन देवशर्मा म्हणाले,

" तर मग आतां मी काय करूं ? "

" पूर्वी दोनदां केलें तेंच ! "

देवशर्म्यांच्या हातचा घांस तसाच राहिला. ते रेणुकेच्या मुखाकडे पहात म्हणाले,

" काय म्हणालीस ? "

" असें म्हणाल्यें कीं सर्वसामान्य मनुष्य आणि आपण, या दोघांना एकाच तोलानें मोजतां येत नाहीं. सामान्याची कसोटी निराळी, आपली निराळी. आज विष्णुपुरीची प्रजा आपल्या छत्रछायेंत अत्यंत समाधानांत नांदत्ये आहे. जर आपणांकडून विष्णुपुरीचें स्वामित्व गेलें, तर या प्रजेचें हें सुख, हें समाधान नष्ट होईल, कमींत कमी त्यांत कांहीं ना कांहीं परिवर्तन तरी अवश्य घडून येईल. हें व्हायला नको आहे. म्हणून आपल्याला पुत्र झालाच पाहिजे. "

" अग पण नशिबीं लिहिला नसेल, तर होईल कुठून ? " देवशर्मा काकुळतीस येऊन म्हणाले.

" नशिबांत लिहिला नाहीं, हें आपणांस कसें कळलें ? तें कांहीं नाहीं. आपणांस परत विवाह केला पाहिजे ! "

महाप्रयासानें देवशर्म्यांस विवाहास अनुकूल करून घेऊन रेणुकेनें या पाळीला जी सवत घरांत आणली, ती स्वभावानें मोठी भाबडी आणि बडबडी होती. तिचें नांव कमला.

कमला वयानें रेणुकेच्या मुलीसारखी शोभणारी होती. दिवसभर ती सारखी गडबड करीत रहायची. तिनें आपल्याबरोबर माहेराहून दोन शुक, दोन सारिका, पांच ससे, एक हरिणशावक एवढीं जनावरें आणलीं होतीं. तिचा सगळा दिवस या जीवांचें खाणेंपिणें आणि त्यांच्या खोड्या काढणें यांत

जायच्या. कधीं एकादा शुक अगर सारिका बोलेनाशी झाली, कीं कमला अप्रसन्न होऊन रेणुकेजवळ येऊन म्हणायची,

" बाई, मी या शुकाला आतां खायलाच नाहीं घालायची ! "

" कां ग ? " हंसून रेणुका विचारी.

" मग तो बोलत कां नाहीं ? "

तात्पर्य, रेणुकेचाही दिवसांतील बराचसा भाग कमलेच्या तक्रारी दूर करण्यांत व्यतीत होत असे.

या लग्नासही चार वर्षे होऊन गेलीं. रेणुकेनें कमलेला तरी संतान व्हावें, याकरितां अनेक देवदेवतांस नवस केले. पण ते देव आणि देवता देवशर्म्यांच्या निपुत्रिकत्वावर कांहीं उपाय करतां दिसेनात.

शेवटीं देवशर्म्यांनीं मनःस्वास्थ्याकरितां कांहीं दिवस जगन्नाथपुरींतील आपल्या प्रासादांत जाऊन रहायचें ठरविलें. रेणुका आणि कमला या दोघींस बरोबर घेऊन ते कांहीं आश्रितांसहित पुरीस येऊन राहिले. तिथें आल्यावर ते प्रतिदिवशीं सूर्योदयापूर्वी स्नान उरकून मंदिरांत जात, आणि जगन्नाथाची प्रार्थना करीत.

नित्यक्रमाप्रमाणें आजहि ते प्रार्थना करीत असतां महन्तांनीं त्यांना इच्छित वस्तूचा त्याग करण्याची सिद्धता, हाच ती वस्तु प्राप्त करून घेण्याचा उपाय सांगितला. तो उपाय ऐकून विमनस्क झालेले देवशर्मा घरीं येऊन आसनावर बसले. इतक्यांत रेणुका हातीं दुग्धपात्र घेऊन आंत आली. देवशर्म्यांस अप्रसन्न पाहून तिनें विचारलें,

" कां ? आपली मुद्रा अप्रसन्न कां झाली ? "

देवशर्म्यांनीं तिला मंदिरांतलि वृत्त सांगितलें. तें ऐकून रेणुका म्हणाली,

" काय ? केवळ त्यागाची सिद्धता असल्यावर इच्छित वस्तु प्राप्त होईल, असें स्वतः महन्त म्हणाले ? "

" होय. स्वतः महन्तांच्या मुखांतले उद्‌गार आहेत ते. "

" तर मग तुम्ही हो म्हणा ! काय वाटेल तें करून कां होईना, आपल्या नांवास लागलेला निपुत्रिकत्वाचा कलंक धुऊन जाऊं दे ! "

" पण झालेलें मूल देवास द्यावें लागेल ! "

" त्याच्या अधिक वेदना तुम्हांला होतील कीं आम्हांला ? त्या सर्व वेदना

सहन करण्याचा भार जर आम्हीं उचलणार आहोंत, तर मग तुम्ही संकोच कां करतां ? उद्यांच जाऊन महन्तांस सांगा कीं माझी सिद्धता आहे. "

दुसरे दिवशीं पहाटे उठून देवशर्मा अतिपवित्र मनानें मंदिरांत गेले, आणि जगन्नाथमूर्तीसमोर बसून ते म्हणाले,

" प्रभो ? माझ्या मनांतले भाव तुला कळतात. मी ज्याची इच्छा करीत आहें, त्याच्या नांवानें अगोदरच उदक सोडून ठेवतों. आतां तुला वाटेल तें कर ! "

मागून महन्तांचा ध्वनि सभामंडपांत घुमला,

" तर मग तुझी इच्छा पूर्ण होईल ! "

अत्यानंदित होऊन देवशर्म्यांनीं विचारलें,

" प्रभु मी ऐकलेलें खरें होईल, असें मी समजू का ? "

" देवशर्मा, आज माझ्या मुखावाटे जगन्नाथच बोलत आहे. तुझ्या घरीं लवकरच बालकाचा रुदनध्वनि ऐकूं येईल ! "

देवशर्म्यांच्या नेत्रांवाटे आनंदाचीं आंसवें वाहूं लागलीं.

* * *

# दोन

दोन मास व्यतीत झाले. लवकरच जगन्नाथपुरीहून विष्णुपुरीस जावें, अशा विचारांत देवशर्मा होते. दिवसभर लेखनिकांस तत्संबंधीं आवश्यक त्या सूचना देऊन सायंकाळीं देवशर्मा जगन्नाथाच्या दर्शनास गेले. अत्यंत श्रद्धेनें त्यांनीं जगन्नाथास नमस्कार केला, आणि म्हणाले,

" प्रभो ! तुझी लीला अचिन्त्य आहे. सगळ्या सृष्टीचें संचालन करणारा तूं; अमुकच एक कर, असा आग्रह तरी मी कशाला करूं ? आता मी तुला कांहींही मागणार नाहीं. तुला जें करायचें असेल तें कर. तूं योग्यच करशील अशी माझी श्रद्धा आहे. "

रात्रीं भोजन आटोपल्यावर देवशर्मा आपल्या मंचकावर दोन्ही हात मानेखालीं घेऊन विचार करीत पहुडले होते. तों पायींच्या पैंजणांचा मृदुमंजुल ध्वनि उमटवीत हातीं विडयाचें तबक घेऊन लाजत लाजत कमला आंत आली.

कमलेला पाहून देवशर्मा मोठे प्रसन्न झाले. तिच्या आणि त्यांच्या वयांत खूपच अंतर होतें. कधीं कधीं देवशर्म्यांस वाटे.

"—हिच्या वयाची माझी मुलगी असती ! दैव, दुसरें काय ? मला जर योग्यवेळीं पुत्र झाला असता, तर मी या गडबडया पोरीला सून म्हणून माझ्या घरीं आणलें असतें ! दुर्दैवी बिचारी !— '

यामुळें तिच्यावर देवशर्म्यांचें खूप प्रेम होतें. त्या प्रेमांत पत्नीविषयक प्रेमाबरोबरच वात्सल्याचाही बराचसा अंश होता. कमलेला पहातांच, देवशर्मा उठून बसले, आणि म्हणाले,

" ये ये ! "

कमलेनें तबक मंचकासमोरील कलाकुसरीचें काम केलेल्या चंदनी तिपायीवर ठेवलें, आणि मंचकाच्या पायथ्याशीं उत्तरीयाच्या टोंकानें आपल्या डाव्या हाताच्या बोटाला वेढे देत ती उभी राहिली.

देवशर्म्यांनीं पुढें होऊन तिचा दंड धरला, आणि तिला आपल्याजवळ बसवीत प्रेमभरानें ते म्हणाले,

"आज एवढ्या लवकरशी इकडे आलीस?"

कमलेच्या मुद्रेवरून असा भास होत होता कीं तिला कांहींतरी अत्यानंदाची वार्ता सांगायची आहे. पण ती कांहींच बोलली नाहीं.

तिचें मुख आपल्याकडे वळवीत देवशर्मा म्हणाले,

"आमच्याशीं बोलायचें नाहीं वाटतें?"

"ऊं हूं!

हंसत देवशर्मा म्हणाले,

"वा वा! हें नव्हे वाटतें बोलणें?"

आपली प्रतिज्ञा विफल झाली, हें पाहून आपलें मुख देवशर्म्यांच्या हातून सोडवून घेत आणि हंसत कमला म्हणाली,

"बरें आहे. बोलायचें. पण मग तुम्ही मला त्याबद्दल काय द्याल?"

"तुझ्या त्या म्हाताऱ्या सवतीला घरांतून हांकून देईन."

कमलेचें रेणुकेवर अत्यंत प्रेम होतें. गाल फुगवून ती म्हणाली,

"तर मग आम्ही नाहीं सांगणार!"

"बरें बरें! तिला पाटावर बसवून तिची पूजा करीन. आतां सांग काय तें. काय, तुझ्या शुकाचें सारिकेशीं लग्न ठरविलेंस?"

"ऊं हूं!"

"मग तुझ्या सशाला पिल्लें झालीं?"

"ऊं हूं!"

"मग तुझें हरीण पळून गेलें?"

"तेंही नाहीं."

"मग काय झालें?"

"बाईना दिवस गेले आहेत!"

देवशर्म्यांचा आपल्या श्रवणशक्तीवर विश्वासच बसेना. ते झडझडून उठून बसले. कमलेचे दोन्ही खांदे धरून गदागदां हलवीत ते ओरडले,

"काय म्हणालीस?"

त्यांच्या हातून सुटायचा प्रयत्न करीत रडकुंडीस येऊन कमला म्हणाला,

" मी खोटें कशाला सांगू ? पाहिजे तर त्यांनाच जाऊन विचारा ! "

अत्यंत स्नेहभावानें कमलेचें चुंबन घेऊन देवशर्मा उठले, आणि धांवतच पाकगृहाकडे निघाले. त्यांच्या पाठोपाठ कमलाही हुंदडत चालली.

पाकगृहांत रेणुका लक्ष्मीसारखी वावरत होती. अजून आश्रितांचीं आणि दासदासींचीं जेवणें उरकलीं नव्हतीं. त्या सर्वांना जेवायला वाढीत रेणुका स्नेहभरानें त्यांची चौकशी करीत होती. एका रुग्ण दासीला ती म्हणाली,

" माये, तुला पाण्यांत शरीर भिजवूं नकोस म्हणून शंभरदां सांगितलें. तरी वस्त्रें धुवायला विहिरीवर कशाला गेली होतीस ? आजार वाढला म्हणजे ? "

ती रुग्ण दासी कांहीतरी उत्तर देणार, तोंच रेणुकेनें असें पाहिलें कीं, वृद्ध देवशर्मा अत्यंत आनंदानें जणूं काय धांवतच पाकगृहाकडे येत आहेत, आणि त्यांच्या मागोमाग कमलाही पायांतील पैंजणांचा ध्वनि उमटवीत येत आहे.

द्वारापाशीं आल्याबरोबर आंतील जेवण करणारीं माणसें पाहून देवशर्म्यांच्या अंतरांत उत्सुकता निर्माण झाली. येतांना त्यांनीं रेणुकेला कसें विचारायचें, याविषयीं अनेक संकल्प केले होते. पण या इतक्या लोकांस पाहून ते संकल्प शरदभ्रांप्रमाणें ठाईंच्या ठाईंच विरघळले.

देवशर्मा दारांतच थांबले. रेणुका त्यांच्याकडे पहात आणि स्मित करीत म्हणाली,

" कां थांबलांतसे ? पाठीमागें कमलाही आहे वाटतें ? बाई बाई ! या माझ्या सवतीला एकदां उन्हांत घर बांधून देईन, तेव्हां मला सुखानें जेवण जाईल. "

कमला आंत येत म्हणाली,

" चांगलें ! मलाच यांनीं धरून किती मारलें ! अन् बाई मजवरच रागावताहेत ! "

" कां मारलें ? "

कमला उत्तर देणार तोंच देवशर्मा म्हणाले,

" तुझें आवरलें ? "

" हो. "

" तर मग इकडे ये ! "

कमलेला धरून तिच्या पाठीवर लटक्या रागानें एक थापट मारीत तिला

बरोबर घेऊन रेणुका देवशर्म्यांच्या पाठोपाठ निघाली. देवशर्मा झपाझप पावलें टाकीत आपल्या शय्यागारांत जाऊन आपल्या मंचकासमोर या दोघींची वाट पहात उभे राहिले.

रेणुका कमलेला म्हणाली,

" तुझ्याच्यानें राहवलें नाहीं ना ? "

तिच्या कुशींत तोंड लपवून कमला म्हणाली,

" एवढें मंगल घडत असतां माझें फाटकें तोंड कसें गप्प राहील ? "

रेणुकेनें अत्यंत स्नेहानें कमलेच्या कपाळावर ओंठ टेकविले, आणि त्या दोघी शय्यागारांत जाऊन पोंचल्या.

देवशर्मा घाईघाईनें पुढें आले, आणि रेणुकेकडे निरखून पहात ते तिला म्हणाले,

" खरेंच ? "

" काय ? "

" हिनें सांगितलेंन् तें ? "

" तिनें काय सांगितलें, तें मला माहीत नाहीं ! " शब्दच्छल करीत रेणुका म्हणाली.

अत्यंत उत्सुकतेनें रेणुकाचा दंड हातीं धरीत देवशर्मा म्हणाले,

" तुला—दिवस गेले आहेत ? "

मान खालीं घालून रेणुका म्हणाली,

" होय ! "

आनंदाच्या आवेगानें देवशर्म्यांच्या नेत्रांतून आंसवें वहायला लागलीं. त्यांचें शरीर कांपूं लागलें. घाईघाईनें ते मंचकावर जाऊन बसले, म्हणूनच खालीं कोसळले नाहींत.

रेणुका पटकन् पुढें झाली, आणि मंचकावर पडलेला पंखा घेऊन देवशर्म्यांस वारा घालीत म्हणाली,

" अस्वस्थता वाटते ? "

" नाहीं ! पण ही वार्ता तूं मला कां सांगितली नाहींस ? " डोळ्यांतलीं आंसवें पुशीत देवशर्मा म्हणाले.

" मलाही तें आजच उगमलें. कमलेला सोडून दुसऱ्या कोणासही ही

वार्ता माहीत नाहीं. आपणांस आज रात्रीं सांगणार होत्यें, तों या चहाडखोर पोरीनें मध्येंच येऊन चुगली केली!"

देवशर्मा उठले, आणि रेणुकेजवळ आले. त्यांनीं दीपदान हातीं घेऊन त्याच्या प्रकाशांत रेणुकेचें मुख न्याहाळून पाहिलें. वार्धक्याच्या प्रांतांत पदक्षेप केलेल्या रेणुकेचें तारुण्य जणूं जागेंच झालें. तिनें लाजून मान खालीं घातली. देवशर्म्यांनीं दीपदान खालीं ठेऊन रेणुकेचा हात धरून तिला मंचकावर बसविलें. द्वाड कमला तोंवर बाहेर पळाली, आणि तिनें द्वार बाहेरून लावून घेतलें.

* * *

संध्याकाळची वेळ. दोन शकट, मागें पुढें चार सहा सशस्त्र अश्वारोही स्वार आणि या तांड्याच्या मागें आठ दहा दासदासी, अशी मंडळी जगन्नाथपुरीहून पांच कोस असलेल्या विष्णुपुरीला निघाली होती. पुढील आश्वारोही स्वारांत एका उमद्या अश्वावर देवशर्मा आरूढ झाले होते. ते आतां पूर्वींपेक्षां खूपच तरुण दिसूं लागले होते. वारंवार अश्व थांबवून ते त्या दोन शकटांपैकीं एका शृंगारलेल्या शकटांत बसलेल्या रेणुकेच्या प्रकृतीची पृच्छा करीत होते. दुसऱ्या शकटांत सामान भरलेलें होतें.

ज्या शकटांत रेणुका आणि कमला बसल्या होत्या, त्यांतच शकटावर असलेल्या आवरणास कमलेच्या शुकसारिकांचे पिंजरे बांधलेले होते. शकटांस दोन भले मोठाले, लांब, रंगवलेलीं शिंगें असलेले पुष्ट बैल जोडले असून त्यांच्या पाठीवर किनखापाचें काम केलेल्या झुली टाकल्या होत्या.

शकटांत खालीं गवत टाकलें असून त्यावर गादी घातली होती. त्या गादीवर काशीस तयार झालेलीं चिटाचीं जाजमें अंथरलीं असून दुतर्फा टेकावयास तक्क्ये ठेवले होते. एका तक्क्यास टेकून रेणुका बसली असून तिच्या मांडीवर डोकें ठेवून कमला आपल्या शुकाला "यावें महाराज! नमस्कार" असें शिकवीत पडली होती.

तो शुक "यावें महा टुकुर टुकुर!" असें कांहींतरी म्हणे. शेवटीं कंटाळून कमला म्हणाली,

"जा मेल्या! जळलें तुझें तोंड! याला हरभऱ्याची डाळ घाला, डाळिंबाचे

दाणे घाला, दगड घाला, धोंडे घाला, पण तेवढें, महाराज कांहीं म्हणतां येत नाहीं. आतां विष्णुपुरीला गेल्यें, म्हणजे सोडूनच देत्यें याला!"

ती वारंवार असेंच म्हणायची, पण तो शुक तिचा भारी आवडता होता. रेणुका म्हणाली,

"कमले, शुकाला बिचाऱ्याला सोडून द्यायच्या गोष्टी करत्येस. आणि उद्यां लेंकरूं झालें म्हणजे? त्याला बोलायला थोडा विलंब झाला तर घराबाहेर कां हांकून देणार आहेस?"

"जा बाई! तुमचें आपलें कांहीं तरीच! मला कशाला होईल लेंकरूं? तुमच्याच लेंकराला मी दूधभात भरवीत जाईन."

"कां? तूं काय माझ्यासारखी म्हातारी झालीस?"

"म्हातारी न झाल्यें म्हणून काय झालें? सगळ्याच तरुणींना कांहीं मुलें होत नाहीत?"

"मला होणार आहे तें? जर मला होतें, तर तुला कां होणार नाहीं?

"तो जगन्नाथाचा प्रसाद आहे."

"मग तूं काय जगन्नाथाच्या प्रसादाला अपात्र आहेस?"

"मला नाहीं माहीत!" असें म्हणून कमलेनें आपलें मुख रेणुकेच्या मांडींत खुपसलें.

"माहीत नाहीं कसें? सगळें माहीत आहे. मला लेंकरूं झालें काय आणि न झालें काय, दोन्ही गोष्टी सारख्याच आहेत. पण तुला झालेलीं मुलें मात्र सगळीं आपल्या घराची शोभा वाढविणारी होतील."

रेणुका असें कां बोलल्ये, तें कांहीं कमलेला कळलें नाहीं. ती उठून बसत रेणुकेला म्हणाली,

"तुम्ही असें काय बोलतां बाई?"

"काय बोलल्यें?"

"दोन्ही गोष्टी सारख्याच म्हणजे?"

कमलेला समजून न देतां एक उमासा टाकीत रेणुका बळेंच हंसून म्हणाली,

"ऊं:! तें मी कांहीं तरी बोलल्यें."

"कांहीं तरी नव्हेच मुळी! सांगा ना बाई!"

बराच वेळ कमलेनें आग्रह केल्यावर हा प्रसाद मिळविण्याकरितां काय करावें लागलें आहे, तें रेणुकेनें तिला सांगितलें. पहिलें लेकरूं देवाला द्यावें लागणार, हें जेव्हां कमलेनें ऐकलें, तेव्हां तिच्या मनाला अत्यंत वेदना झाल्या. कांहीं वेळ स्तब्ध राहून मग ती रेणुकेच्या शांत, संयमी मुद्रेकडे करुण भावानें बघत म्हणाली,

" बाई, हें बदलतां येणार नाहीं कां ? "

" काय ? "

" देवाचें हें देणें अमान्य केलें तर ? "

" छी छी ! असें बोलूं नये ! एकदां दिलेलें वचन कोणी मोडत असतो कां ? "

ही गोष्ट अटळ आहे, हें तर कमलेलाही माहीत होतें. जेव्हां तिला दुसरा उपाय सुचेना, तेव्हां असहाय्य होऊन तिचे डोळे पाण्यानें भरून आले. तें पाहून हसून तिच्या गालावर चापट मारीत रेणुका म्हणाली,

" वेडी ! कुणी रडत असते का असें ? "

" पण बाई ! केवढी मोठी शिक्षा ही ? "

" शिक्षा नव्हेच मुळीं ही ! हें कुळाचें नांव उज्ज्वल ठेवण्याकरितां करावें लागणारें कर्तव्य आहे. निपुत्रिक अवस्थेत यांचे इतके दिवस गेले. रात्रंदिवस हे चिंतेनें कसे झुरत होते, तें तूं पाहिलें नाहींस पोरी ! त्यांना आतां केवढें समाधान लाभेल ! मला एकटीला जें काय भोगावें लागणार आहे, तेवढ्यामुळें किती माणसें सुखी होतील, हें तुला माहीत आहे का ! यांच्या नांवावर आलेला कलंक दूर होईल. विष्णुपुरीचें स्वामित्व या कुळांतून निघून दुसरीकडे जाईल, हें भविष्य खोटें होईल. "

" पण यामुळें तुम्हांला काय लाभ ? "

" प्रत्येक गोष्टीचें महत्त्व एका व्यक्तीच्या लाभावरच मोजलें जातें काय ? "

" एका आईपासून तिचें म्हातारपणीं झालेलें लेकरूं हिरावून घेणें ही गोष्ट एवढी तुच्छ आहे काय ? बाई, या वेदना तुमच्या आशीर्वादानें एक वेळ मी सहन करूं शकेन. अजून मी युवती आहें. पण तुम्हांला हा जो आघात सहन करावा लागेल, त्याचें मूल्य तुम्ही कमी कां समजतां ? "

" मी तें मूल्य कमी कां समजत्यें ! वेडी माझी बाई ती ! "

" ऊंहूं ऊंहूं बाई ! वेडी म्हणून मला असें अव्हेरूं नका. दिवसभर बडबड करीत माझ्या शुकसारिकांत दंग असत्यें, म्हणून मला एवढेंही कळत नाहीं, अशी धारणा करून घेऊं नका तुम्ही. मीही स्त्रीच आहें ना? तुम्हांहून वयानें लहान असल्यें, म्हणून काय झालें ! मीही तर स्त्रीचेंच मन घेऊन जन्मास आलेली आहें."

" कळलें, कळलें बरें मला तुझें मन!" कमलेच्या मुखावरून हात फिरवीत रेणुका म्हणाली, " हें मूल्य एका स्त्रीच्या लेखीं मुळीच कमी नाहीं. पण एका कुटुंबाच्या हिताकडे पाहतां त्यांतील एकानें स्वतःच्या भावनांचा होम करायला पाहिजे. कमले ! कुटुंब मुख्य, व्यक्ति गौण."

कमला सचिंतपणें कुठेंतरी पहात म्हणाली,

" बाई, हें तुमचें तत्त्वज्ञान मला उमजत नाहीं, कधींकाळीं उमजावें अशी इच्छाही नाहीं. पण तुमच्यावर माझी जी श्रद्धा आहे, ती कधींही कमी न होईल असा आशीर्वाद मला द्या म्हणजे झालें."

तिला जवळ ओढीत रेणुका म्हणाली,

" देईन बरें ! तसाच आशीर्वाद देईन."

★ ★ ★

प्रसूतिगृहाकडे सचिंत देवशर्म्यांच्या सारख्या येरझारा सुरू होत्या.

त्यांची अवस्था मोठी विचित्र झाली होती. या संतानलाभाबद्दल आनंद मानावा कीं खेद याचा त्यांना उलगडा होत नव्हता. अनेक नवसासायासानंतर आयुष्याच्या अन्तिम पर्वास प्रारंभ झाला असतां होणारें प्रथमच अपत्य, ही वस्तुतः मोठी सुखकर कल्पना होती, यांत कांहीं शंका नाहीं. जेव्हां देवशर्मा याच एका विचारांत गुंग होत, तेव्हां त्यांना अननुभूत सुखाच्या सागरांत मनसोक्त स्नान केल्याचा आनंद प्राप्त होई.

ते विचार करीत,

' तें लेकरूं कसें असेल ? माझ्यासारखें कीं रेणुकेसारखें ? पुत्र कीं कन्या ? इवलाले हात, इवलाले पाय. इवलाले डोळे, लुकलुकणाऱ्या चांदणीसारखे !'

' थोडें खेळतें झालें, म्हणजे माझ्या मिशा धरून ओढील तें ! हो ! लहान पोरें मिशाच ओढीत असतात. फार खोडकर असतात लहान मुलें.

' रडेल तर सगळें घर निनादून जाईल. लहान मूल रडलेलें अधिक-चांगलें, असें वैद्यकशास्त्राचें मत आहे.

' रांगायला लागलें, कीं त्याला एवढें मोठें घर कांहीं पुरेसें व्हायचें नाहीं. क्षणांत इकडे येईल, दुसऱ्या क्षणीं तिकडे. त्याच्याकरितां याची नीट शुश्रूषा करील, अशी एखादी दासी ठेवली पाहिजे. या घरच्या दासी सगळ्या निकामी आहेत त्या बाबतींत. त्याना कोणालाच लहान लेंकरूं खेळवायची संवय नाहीं. त्या नुसत्या इकडून तिकडे मिरवायच्याच उपयोगाच्या !

' मोठें झालें म्हणजे— '

तोंच देवशर्म्यांच्या छातींत एकदम धस्स होई !

जणूं काय स्वर्गाच्या दारांतून आंत पाऊल घातलेल्या माणसास लोटून द्यावें, तो अनंतकाळपर्यंत खालीं कोसतळच असावा; त्याच्या पडण्याला, पतनाला केवळ आदीच काय तो आहे, अंत नाहीं, पार नाहीं, सीमा नाहीं, मर्यादा नाहीं !

तसें देवशर्म्यांचें होई.

जेव्हां त्यांना जगन्नाथाच्या मन्दिरांत केलेली प्रतिज्ञा आठवे, तेव्हां त्यांचे ज्ञानतंतु काम करीनासे होऊन मस्तक सुन्न होऊन जाई. बराच वेळ त्यांना कांहीं कळतच नसे. आणि ती पीडादायक स्मृति जागी झाली, कीं जणूं काय त्यांच्या शरीरास सहस्रावधि इंगळ्यांचा दंश झाला असावा, तशा वेदना होत.

ही अनुभूति येतां क्षणींच मधाच्या आनंदसागरांतून ते बाहेर फेंकले जात. सर्व संसार त्यांना निःसार भासूं लागे. ते म्हणत,

' छे छे ! सगळें खोटें !

' येणें, जाणें, असणें, नसणें, हें सगळें मिथ्या !

' आहे म्हणजे काय ? नाहीं म्हणजे काय नाहीं ? खऱ्याला खरेंपण कुठून आलें ? खोट्याचें खोटेंपण कशावरून ठरलें ?

' या सर्व कल्पना अगदीं भ्रामक आहेत !

' विश्व हा नुसता बुडबुडा ! अगदीं क्षणभंगुर ! कशाचें सुख ? कशाचें दुःख ? सुखादुःखाच्या व्याख्या कुणी ठरविल्या ! ज्यानें ते संकेत निश्चित केले, त्यानें अत्यंत मोठी आत्म आणि परवंचना केली !

' एऱ्हवीं संतानलाभ आणि तोही या वयांत होऊन मी सुखी झालों नसतों काय ?

' ऊं हूं ! कांहींच शाश्वत् नाहीं. जें दिसतें, तेंही नाहीं, आणि जें दिसत नाहीं, तेंही नाहीं ! सगळेंच स्वप्न ! सगळीच फसवणूक !

' संतान होऊन आनंद होतो ?

' कोणता मूर्ख असें म्हणतो ? त्याला म्हणावें, मला येऊन विचार म्हातारपणीं पहिलें लेंकरू जन्म पावत असतांनाच्या या वेदना जर कोणाला श्लोकबद्ध करतां आल्या तर ?

' पण त्या कोणासाठीं करायच्या ?

' खोळ्यासाठीं ? जें कधींच टिकणार नाहीं, अशासाठीं ? चिरंजीवपणाचा अंगरखा घालून जें नाशिवंत तें या खोट्या, दुसऱ्या क्षणीं नष्ट होणाऱ्या जगांत मोठ्या थाटामाटानें मिरवेल, त्याच्यासाठीं ?

' मुळींच नाहीं ! मुळींच नाहीं ! '

अशा भ्रांत विचारांत मग्न झालेले देवशर्मा प्रसूतिगृहाकडे वारंवार खेटे घालीत होते.

सूतिकांची धांवपळ सुरू होती. बहुधा सगळा गांव मोठ्या आनंदपूर्ण उत्सुकतेनें देवशर्म्यांच्या प्रासादाच्या दारीं एकत्र झाला होता. भेरी, तुंबळ, नगारे इत्यादि वाद्यें वाजविणारे लोक अगदीं उत्कंठित होऊन लेंकराच्या रुदनध्वनीची वाट पहात होते. पुरोहित वर्ग पंचांगें समोर ठेवून डोळ्यांत तेल घालून बसला होता. हेतु हा कीं, पत्रिका करतांना एवढीसुद्धां चूक होऊं नये.

मध्येंच कमला प्रसूतिगृहांतून घाईघाईनें बाहेर आली. भ्रमितचित्त देवशर्मा तिला अडवून म्हणाले,

" काय झालें ? "

" अजून कांहीं नाहीं ! "

एक सुस्कारा टाकून देवशर्मा म्हणाले,

" नाहीं ना ? बरें झालें ! "

काय बरें झालें, तें समजावून घेण्यापुरता वेळ कमलेजवळ नव्हता. ती तशीच घाईघाईनें परत प्रसूतिगृहांत गेली.

सर्वांची उत्कंठा अगदी शिगेस जाऊन पोंचली.

देवशर्म्यांच्या वृद्ध नेत्रांतून आसवें गळूं लागलीं. तीं आनंदाचीं होतीं,

कीं दुःखाचीं, हें स्वतः त्यांनाही माहीत नव्हतें.

तोंच प्रसूतिगृहांतून बालकाचा रुदनध्वनि बाहेर सर्वांच्या कानीं पडला.

देवशर्मा डोळे पुशीत एक उसासा टाकून स्वतःशीं पुटपुटले,

" झालें ! "

बाहेर आनंदाचा नुसता गदारोळ माजला. लोक आनंदानें अंगवस्त्रें उडवूं लागले. वाद्यांच्या ध्वनीनें कानठळ्या बसायची पाळी आली. स्त्रिया मंगलगीतें गाऊं लागल्या.

कमला नाचतच बाहेर आली, आणि देवशर्म्यांजवळ जाऊन म्हणाली,

" ऐकलेंत ?"

देवशर्म्यांनीं कांही ऐकलें नाहीं. त्यांचा हात हलवीत कमला म्हणाली,

" ऐकलेंत का ? कन्या झाली ! "

" कुणासारखी आहे ? " मंद स्वरांत देवशर्म्यांनीं विचारलें.

" कुणासारखीच नाहीं. पण फार सुंदर आहे. "

लोक आनंदानें एवढे उन्मत्त झाले होते, कीं पुत्र न होतां कन्या झाली, या वार्तेनें त्यांच्या आनंदांत यत्किंचित्‌हि उणेपणा आला नाहीं.

★ ★ ★

## तीन

रेणुका आणि कमला, दोघींचें मोठें भांडणच झालें.

प्रश्न अगदीं सामान्य होता. रेणुका म्हणाली,

" ही मुलगी देवाला द्यायची. तर मग हिचें नांवच ठेवूं नये. जशी त्यानें दिली, तशी त्याच्यापुढें नेऊन ठेवावी."

हें ऐकून कमला रागारागानें पुढें झाली. तिनें रेणुकेच्या कुशींत झोंपलेली ती बारा दिवसांची चिमणी गोजिरवाणी सानुली उचलली, आणि म्हणाली,

" येऊं दे तर खरी देवाला! पोर काय तुमची एकटीचीच कीं काय? आतां मी पोरीला मुळींच तुमच्याजवळ द्यायची नाहीं."

रेणुका लटक्याच विरक्तीनें म्हणाली,

" नको देऊंस! तशीच नेऊन ठेवीनास का देवळांत!"

फणकाऱ्यानें पोरीला छातीशीं लपवीत कमला म्हणाली,

" अशी बरी नेऊन ठेवीन! मोठा आला तुमचा देव!"

पण एवढें बोलल्यावर तिचें तिलाच लाजल्यासारखें झालें आणि गडबडीनें ती म्हणाली,

" मी कांहीं देवाला नावें ठेवीत नाहीं! पण तुमचें तरी काय हें बोलणें झालें! सोन्यासारखी पोर ग बाई माझी ती!" कौतुकानें मुलीच्या चिमण्या मुखाकडे पहात कमला म्हणाली, " हें असें माणिकमोलाचें लेंकरूं, आणि म्हणे तिचें नांव ठेवूं नका! सांगून ठेवतें बाई! जर तुम्ही या लेंकराचा असा दुस्वास करणार असाल, तर मग मी जेवणार नाहीं, खाणार नाहीं, पाणी पिणार नाहीं, तश्शी बसून राहीन!"

हंसून रेणुका म्हणाली,

" अन् तरी मी तिच्याकडे लक्ष न दिलें तर?"

चिडून कमला म्हणाली,

" तर मग मी उठून जेवेन, खाईन, पिईन! मात्र या पोरीला कांहीं तुमच्याजवळ देणार नाहीं! मीच वाढवीन हिला!"

" बरें बाई कमले ! भांडूं नकोस. दे इकडे पोर. नाहीं करायची दुस्वास."

" पण मग नांव काय ठेवायचें तें नाहीं सांगितलेंत ?"

" तूंच ठेव काय तुला ठेयायचें तें."

" मग मी सांगूं कां ? मी हिचें नांव पद्मा ठेवीन. मला तें नांव फार आवडतें. आणि माझी ही सोनुली आहेही पद्मासारखी सुंदर !"

त्या दिवशीं सायंकाळीं देवशर्म्यांचा एवढा मोठा प्रासाद, पण माणसांच्या गर्दीपुढें अगदीं तोकडा भासूं लागला. नाना प्रकारचीं, अनेक गांवांचीं माणसें देवशर्म्यांच्या म्हातारपणच्या मुलीचा नामकरणविधि साजरा करण्याकरितां गोळा झाली होतीं.

अनेकांनीं त्या कन्येला आणि तिच्या आईला नाना प्रकारचीं वस्त्रें आणलीं होतीं. अलंकारही खूपच होते. विष्णुपुरीतले कृषिक भाज्या, फळफळावळ इत्यादि घेऊन उपस्थित झाले होते. प्रासादाबाहेर नानाप्रकारचीं मंजुळ वाद्यें वाजत होतीं.

आजच्या समारंभाची देवता होती कमला. आलेल्या स्त्रियांचा सत्कार करण्यांत ती अगदीं मग्न होऊन गेली होती. मध्येंच ती रेणुकेच्या खोलीकडे येई, आणि पोरीचा एक मुका घेऊन हातांतील अलंकार रेणुकेला दाखवून म्हणे,

" बाई, पद्मेला हा बाहुबंद चांगला दिसेल नाहीं ?"

हंसून रेणुका म्हणे,

" एवढ्याशा पोरीला करायचे काय एवढे अलंकार ? तूं त्या अलंकारांनींच पोरीचें सबंध शरीर झांकून टाकशील !"

" असूं द्या ! आज एवढ्या लोकांसमोर नाहीं घालायचे, तर मग केव्हां घालायचे ?"

अम्बिका मात्र विरक्त होऊन आपल्या खोलींत आपल्या दासीशीं कुसफुस करीत बसली होती. कमला जणूं धांवत धांवतच तिच्या खोलींत आली, आणि अम्बिकेकडे पाहून ती आश्चर्यानें म्हणाली,

" हें हो काय बाई ?"

" काय ?" कटु स्वरांत अम्बिकेनें विचारलें.

" तुम्हीं तर अजून कांहींच केलें नाहीं !"

" काय करूं ?"

" तुमचें केशसंवाहन व्हायचें आहे अजून ! आणि तुम्ही हेंच जुनें वस्त्र नेसणार का ? अलंकारही घातले नाहींत तुम्ही अजून ? "

" कशाकरितां करायचा थाटमाट ? " स्वरांत कमलेला जाणवेल एवढी वक्रता निर्माण करीत अम्बिका म्हणाली.

ती वक्रता ध्यानीं न घेतां कमला म्हणाली,

" आज नामकरणसंस्कार नाहीं का ? "

" कुणाचा ? "

आश्चर्यानें स्तंभित होत कमला म्हणाली,

" कुणाचा म्हणजे ? थोरल्या बाईंच्या मुलीचें आज बारसें नाहीं का ? "

" असेल की ! कुणाचें बारसें असो, नाहींतर कुणाचें बारावें असो ! मला काय त्याचें ? "

तिनें केलेल्या अशुभ संकेतानें काळवंडून जाऊन कमला म्हणाली,

" भलतेंच काय बोलतां बाई ? "

" काय भलतेंच बोलत्यें मी ? "

" भलतेंच नाही तर काय ? आज सगळा गांव घरीं गोळा झालेला. सगळीं माणसें आनंदात डुंबत असलेली, म्हणून तुम्हांला विचारायला गेल्यें. तों तुम्ही आपलें कांहींतरीच बोलूं लागलांत ! "

" मग काय त्या तुमच्यासारख्या नटून थटून लोकांच्या पुढें पुढें करतील ? " दासी मध्येंच तोंड घालीत म्हणाली.

" तूं गप्प बैस ग ! " तिला दटावीत कमला म्हणाली, " बाई, कमींत कमी लोकांत बरें दिसावें म्हणून तरी बाहेर येऊन आयाबायांशीं चार गोष्टी बोला ! "

" मुलगी काय मला झाली आहे एवढा आनंद व्हायला ? "

" तुम्हांला नसेल झाली. मलाही झाली नाहीं. पण म्हणून काय ती मुलगी आपली कोणी नव्हे ? "

" तुला एवढी हौस असेल, तर गळ्यांत बांधून नाच दिवसभर. मी कांहीं आज या खोलीबाहेर पडायची नाही ! पुनःपुनः मला त्रास द्यायला येऊं नकोस !"

" नाहीं येणार ! " खिन्न होऊन कमला म्हणाली, " पण बाई तुम्हांला एक बरीक सांगून ठेवत्यें. "

" काय ? "

" थोरल्या बाईचा दुस्वास तुम्ही नेहमीं करीत असतां. कराना का ! मला त्याच्याशीं कांही करायचें नाहीं. पण त्या गोजिरवाण्या लेकराचा दुस्वास करून कांही कोणाचें बरें व्हायचें नाहीं, हें मी भविष्य करून ठेवल्यें. "

एवढें बोलून डोळे पुशीत कमला झटक्यानें बाहेर पडली.

सायंकाळीं नामकरण संस्कारास प्रारंभ झाला. आवश्यक तो वैदिक विधि आटोपल्यावर पुरोहित रेणुकेला म्हणाले,

" मातोश्री, नांव काय ठेवायचें ? "

" नांव ? कमलेला विचारा. "

कमलेकडे वळून पुरोहित म्हणाले,

" आपली काय इच्छा आहे ? "

" पद्मा ! " कमला म्हणाली.

पुरोहित सन्तुष्ट होऊन म्हणाले,

" वा वा ! छान नांव आहे. आणा मुलगी इकडे. "

पुरोहितांनी वस्त्रांत गुंडाळलेली ती लहानगी पोर हातीं घेतली, आणि अंगुली मधांत बुडवून तिच्या तोंडांत घालीत तिला म्हणाले,

" ऐकलेंस काय पोरी ! तुझें नांव पद्मा. "

ती लहानशी पोर खुदकन हंसली.

नंतर उत्तम सजविलेल्या पाळण्यांत तिला घालून सगळ्या स्त्रियांसह रेणुकेनें तिला झोके देत गाणीं म्हटलीं. बरीच रात्र होईपर्यंत ती गडबड सुरू होती.

दिवसभर देवशर्मा लोकांचें स्वागत हंसतमुखानें करीत होते खरे. पण त्यांच्या त्या हंसतमुखाच्या आडून सूक्ष्मपणें पाहाणारास त्यांच्या मुखावर पसरलेल्या चिंतेचें जाळें दिसून येत असे. कमलेच्या नजरेंतून ती गोष्ट सुटू पावली नाहीं.

बहुधा सगळी मंडळी घरोघर जाऊन जेवणें आटोपल्यावर देवशर्मा रेणुकेच्या खोलींत आले. त्यांना पाहून रेणुका उठूं लागली. तों काकुळतीस येऊन ते म्हणाले,

" नको नको ! उठूं नकोस. पडून रहा. आवरलें सगळें ? "

" होय. "

" पोर झोंपली काय ? "

" होय. नुक्तीच झोंप लागली आहे. "

रेणुकेच्या मंचकाजळ ठेविलेला दीप उचलून देवशर्म्यांनीं मुलीचें मुख न्याहाळून पाहिलें. तो चिमुकला जीव पांघरुणाच्या उबेंत स्वस्थ झोंपीं गेला होता. तिचें तें सुंदर मुख पाहून देवशर्म्यांस मोठें बरें वाटलें. बराच वेळ ते तिच्या मुखाकडे बघत होते.

हळूंहळूं मुखावरील प्रसन्नतेची जागा खेदानें घेतली. एक उसासा सोडीत देवशर्म्यांनीं दीप ठेवून दिला.

रेणुका म्हणाली,

" कां ? उसासा सोडलांत ? "

" नाहीं ! उगीच ! "

एवढें वाईट वाटून घ्यायचें कांहींही कारण नाहीं. येऊन जाऊन कन्याच ती. आज ना उद्यां सासरीं गेली, कीं आपणांपासून दुरावयाचीच. ती इकडे जाईल, याहून अधिक कांहीं होणार नाही. "

" खरें आहे. " असें म्हणून हळूं हळूं देवशर्मा बाहेर पडले.

★ ★ ★

दीड वर्षाच्या पद्मेला कमला भात भरवीत होती. ती मुकाट्यानें बसून गुट्टगुट्ट भात खात होती. भरविणें झाल्यावर तिच्या खरकट्याच तोंडाचा एक मुका घेऊन कमला म्हणाली,

" माझा राजा तो ! गुट्टगुट्ट भात जातोय पोटांत ! भारी शहाणी आहे हो माझी सोनी ! "

रेणुका स्वयंपाकगृहाच्या दारांतून ती गंमत पहात होती. तिनें कोणास कळूं न देतां एक उसासा टाकला, आणि म्हणाली,

" कमले, किती कौतुक करशील पोरीचें ? "

कमला तिच्याकडे पहात म्हणाली,

" कां ? मग काय वाऱ्यावर सोडून देऊं ? "

" तें मला माहीत नाहीं. पण जी वस्तु आपली नाहीं, तिचा मोह कां धरावा ? "

" पण मी म्हणत्यें बाई, माझ्या पोरीचें मी कौतुक करत्यें, तर लोकांच्या पोटांत कां दुखतें हो ? "

टचकन् तिच्या डोळयांत पाणी आलें. रुद्ध स्वरानें ती म्हणाली,

" कमलाच्या पुष्पासारखी कोवळी सुकुमार पोर ! तुम्ही तिचे कौतुक करीत नाहीं, हे उसासे टाकीत बसतात. मींच कुठें थोडेसें तिचे लाड केलेले कुणाला कां हो पाहवत नाहीत ?

" सगळे म्हणतात, ही पोर आपली नव्हे !

" आपली नाहीं तर कुणाची ? देवाला द्यायची म्हणजे कुठें रानांत तर सोडून द्यायची नव्हे ना ? पर्वतावरून तर कडेलोट करायचा नाहीं ना ? वाघापुढें तर टाकायची नाहीं ना ?

" मग हिचा का सगळे एवढा राग करतात ?

" मी एकदांच सगळयांना सांगून ठेवल्यें. मी हिला वाटेल तसें वागवीन. मला कोणी बोलतां उपयोगाचें नाही. नाहीं तर जर मला हीं बोलणीं सोसेनाशीं झालीं, तर मग मी कुठें तरी समुद्रांत जीव देईन ! कुणाला कळूंही द्यायची नाहीं ! बरोबर या पोरीलाही घेऊन जाईन. म्हणजे तुमच्या सगळयांच्या डोळयांतला कांटा निघून जाईल एकदांचा ! "

रेणुका हें बोलणें ऐकून थक्क झाली. भाबडी कमला एवढी संतापूं शकते, हें तिला आज कळलें. कांहीं न बोलतां कमलेच्या कुशींत बसलेल्या पद्मेला तिथेंच सोडून रेणुका तिथून दुसरीकडे गेली.

तात्पर्य स्वतः कमलेच्या देखरेखीखालीं पद्मेचे दिवस मोठ्या आनंदांत जाऊं लागले.

पुनः वाद उपस्थित झाला, तो पद्मेला सहावें वर्ष लागलें तेव्हां. एके दिवशीं सकाळी कमला संध्या करीत असलेल्या वृद्ध देवशर्म्यांना म्हणाली,

" ऐकलेंत ? "

" काय म्हणत्येस ? "

" म्हटलें कोणी तरी पण्डित पहावा. "

" कशाला ? कांही व्रत करायचें आहे ? "

" ऊं हूं. "

" मग ? "

" पद्मेला शिकविण्याकरितां."

देवशर्मा कमलेच्या मुखाकडे पहात राहिले. तिची निश्चयी मुद्रा पाहून त्यांना अधिक उणें बोलवलें नाहीं. ते कांही वेळानें म्हणाले,

" असें असें ! तर मग तें मजकडे नाहीं."

" मग कोणाकडे ?"

" तिच्या आईला सांग. ती व्यवस्था करील."

कमला लगेच निघून रेणुकेजवळ गेली. रेणुका देवपूजेचें साहित्य जुळवीत होती. जेव्हां तिनें कमलेचा हा प्रस्ताव ऐकला, तेव्हां थक्क होऊन ती म्हणाली,

" कमले, तुझ्याशीं बाई बोलतां येत नाहीं मला. पण तुझ्या मनांत तरी काय आहे ?"

" काय ?"

" तूं पद्मेला पण्डिता का करणार आहेस ?"

" जुळलें तर तेंही करीन."

" लाभ काय यापासून ?"

" प्रत्येक गोष्टीपासून लाभच पहायचा असतो का बाई ? तुम्ही व्रतें करतां, त्यापासून काय लाभ ?"

थोडी माघार घेत रेणुका म्हणाली,

" लाभ ? इहलोकीं नसेल. पण परलोकीं तर आहे ना ?"

" परलोकींच्या लाभाकडे दृष्टि ठेऊन तुम्ही जर व्रतें, वैकल्यें करतां, उपासतापास करून देहाला शिणवितां, दानधर्म करतां तर मग इहलोकींच ज्या पोरीला विद्येपासून लाभ होणार आहे, तिच्याकडे सर्वथा दुर्लक्ष करून पदरांत काय पडेल ?"

" पण जी मुलगी देवाला द्यायची आहे—"

" बाई, आजपर्यंत हजार वेळां मी तुमच्या मुखांतून हेच शब्द ऐकले आहेत. देवाला द्यायची वस्तु काय वाटेल तशी असावी ! देवाला द्यायचा पदार्थ काय चांगला नसावाच ?

" आणि तो देवही काय इतका निष्ठुर आहे ?

" तुम्हा लोकांना काय वाटत असेल तें असो. पण माझा तर विश्वास

आहे, कीं या सद्गुणी पोरीचें तो कल्याणच करील. हळूंच एके दिवशीं तो माझ्या समोर उभा राहून मला सांगेल, की या पोरीकरितां मी करून ठेवलेली ही व्यवस्था.

" तुम्हा सर्वांपेक्षां मी अधिक अश्रद्ध आहें. जेवढ्या श्रद्धायुक्त मनानें तुम्ही देवाला नमस्कार करतां, तेवढें श्रद्धायुक्त मन कांहीं माझेजवळ नाहीं.

" तरी पण मला मनोमनीं असें सारखें वाटतें, की या पोरीचें कांहीं अकल्याण व्हायचें नाहीं ! "

रेणुकेच्या मनांतला कमलेविषयींचा आदरभाव शतगुणित होऊन उठला. ती उठून कमलेजवळ आली, आणि तिच्या खांद्यावर हात ठेवीत तिचें मुख उचलून म्हणाली,

" कमले, काय वाटेल तें कर. आजपासून मी ती पोर सर्वथा तुझ्या स्वाधीन केली. तूं काय वाटेल तें कर तिचें. मला विश्वास आहे कीं, तुझ्या हातून तिचें अकल्याण व्हायचें नाहीं ! "

कमलेनें पटकन् वांकून रेणुकेच्या पायांस हात लावून नमस्कार केला, आणि ती पण्डितास बोलावणें पाठविण्यास गेली.

कमलेच्या इच्छेप्रमाणें बुद्धिमान् पद्मेची अध्ययनांत तर प्रगति होत चालली. पण तिला वस्त्रभूषणांनी नटविण्याचे कमलेचे प्रयत्न मात्र निष्फळ ठरूं लागले. पद्मेच्या ठिकाणीं या सर्व वस्तूंविषयीं अरुचीच दृष्टोत्पत्तीस येऊं लागली.

एके दिवशीं कमलेनें एक नवीन शिरोभूषण मुद्दाम पद्मेकरितां करविलें आणि तिनें तें तिच्या विपुल केससंभारांत नीट बसविलें.

थोड्याच वेळांत पद्मा कमलेजवळ आली, आणि तिला म्हणाली,

" आई ग ! " ती कमलेला आई आणि रेणुकेला बाई म्हणत असे.

" काय ? " कमला म्हणाली.

" माझ्या डोक्यांतलें हें शिरोभूषण काढून टाक. "

" कां ग ? "

" तें मला आवडत नाहीं. "

" वा ग वा ! आवडत नाहीं म्हणे ! बरं. आवडत नाहीं तर काढून ठेव. दुसरें घाल. "

" दुसरेंही नको. "

" कां ग ? " आश्चर्यानें तिच्याकडे पहात कमली म्हणाली.

" मला आवडत नाहीं. "

" मग काय आवडतें ? "

" मला नुसतेंच राहणें आवडतें. गुरुदेवांची मुलगी नाहीं का नुसतीच रहात ? ती कुठें घालत्ये शिरोभूषणें ? "

पद्मेचा तो युक्तिवाद ऐकून कमला थक्क झाली. ती म्हणाली,

" अग, तिच्याजवळ नाहींत, म्हणून ती घालीत नाहीं. तुझ्याजवळ पुष्कळ आहे, तूं घालावेंस ! "

" तरी नकोच मला. हीं हातांतील कंकणेंही काढून टाकावींशी वाटतात मला. "

" मग बाई, तुला आवडतें तरी काय ? "

" मला साधेंच राहणें आवडतें. "

कमला थोडी रागावून म्हणाली,

" तर मग रहा तशीच ! पुढले डोहाळे होताहेत तुला आणखी काय ? "

कमलेनें ती वार्ता जेव्हां रेणुकेला जाऊन सांगितली, तेव्हां हंसत रेणुका म्हणाली,

" कमले, मनुष्य आपल्या भविष्याची सिद्धता अगदीं लहानपणापासून करीत असतो. तूं तरी काय करशील ? तिच्या ललाटींच जर तें लिहिलें असेल, तर तें तूं बदलायचा प्रयत्न करून बदलणार का आहे ? "

कमलेनें कांहीं प्रतिवाद केला नाहीं.

पद्मेची ही विरक्तता दिवसेंदिवस अधिकाधिक वाढूं लागली. भोजनांत तिला आवडनिवड नसे. वस्त्रप्रावरणांविषयीं ती उदासीन असे. एवढीशी लहान पोर, पण तिच्या ठिकाणचा हा विरक्त भाव पाहून सर्वांसच मोठें आश्चर्य वाटे. कधीं कधीं ती एकटीच पुष्पमंडपांत जाऊन फुलांच्या रंगांकडे पहात बसायची.

वस्तुतः तिचें हें वय क्रीडा करण्याचें. लागतील तितक्या मुलीही हाताशीं उपलब्ध होत्या. सबंध गांवांतील सारक्या सारक्या पोरी पद्मेशीं खेळण्या-करितां तिच्या घरीं गोळा होत. पण अनेकदां त्या पोरींवर आपापसांतच

खेळायचा प्रसंग येई. कारण पद्मा आपल्या अत्यंत गोड सुरांत कुठें तरी एखाद्या लता-कुंजांत कांहींतरी गुणगुणत एकटीच बसायची.

रेणुका उदासीन भावानें तटस्थासारखी पद्मेच्या दिनक्रमाचें निरीक्षण करीत असे. देवशर्मा आपल्या त्या अत्यंत सुंदर, बुद्धिमान् पण विरागिनी मुलीला जवळ घेऊन थोपटीत बसत. कांहीं वेळानें ते तिला दूर करून उसासा सोडीत, आणि दुसऱ्या कामास लागत.

कमला मात्र वारंवार पद्मेच्या मनांत सुखोपभोगांविषयीं अनुरक्ति निर्माण करण्याचा निष्फळ प्रयत्न करी.

एकदां पद्मा कमलेला म्हणाली,

" आई, मी विष्णुमंदिरांत जाऊं ? "

" एकटी जाऊं नकोस. "

" मग काय करूं ? "

" दासीला घेऊन जा. "

" पण एकटी गेलें तर काय होईल ? "

" आपल्यासारख्यानें एकटें जाऊं नये. "

" कां ? "

" लोक नांवें ठेवतात. "

" मग तुझ्या दासीची मुलगी कशी एकटी जाते ? "

" ती दरिद्री आहे म्हणून एकटी जाते. "

" दरिद्री मुलगी जर एकटी जाते, तर मला कां जातां येऊं नये ? मी एकटीच जाईन. "

संतापून कमला म्हणे,

" जा ! संन्यासिनी कुठली ! भिक्षुणी ! तुझ्या कपाळीं तेंच लिहिलें आहे. "

अशा रीतीनें पद्मेचे दिवस जात असतां तिचें अध्ययनही चाललें होतें. तिच्या वयाला बारा वर्षे संपून तेरावें लागलें. मूळचीच नीटस पोर आतां अधिकच देखणी दिसूं लागली. वयाच्या मानानें स्त्रियांना समज लवकर येते. पद्मेला ती अधिक लवकर आली.

एके दिवशीं रेणुका देवशर्म्याजवळ येऊन उभी राहिली. तिचे डोळे नुकतेच रडल्यानें रक्तवर्ण झाले होते. थोड्या वेळानें ती म्हणाली,

" ऐकलें का ? "

" काय ?

" पोरीला बारावें वर्ष संपून तेरावें लागून गेलें. "

देवशर्म्यांनीं हातीं असलेलें ग्रंथाचें पान खालीं ठेवलें. त्यांच्या छातींत धस्स झालें. ते म्हणाले, " एवढ्यांत लागलें तेरावें ? "

" होय. "

" मग काय म्हणणें आहे ? "

" जगन्नाथाजवळ केलेला संकल्प लक्षांत आहे ना ? "

देवशर्म्यांचें मुख विवर्ण झालें. थोड्या वेळानें ते म्हणाले, " मग पुरीस गेलेंच पाहिजे का ? "

" होय. ज्याचें त्याला देऊन टाकावें, तें बरें. "

" कांहीं दिवसांनीं गेलों, तर नाहीं चालायचें का ? "

" नाहीं. "

" कां ? "

" कमलेला दिवस गेले आहेत ! जगन्नाथाची अवकृपा होऊन तिच्या गर्भास कांहीं वेडें वांकडें व्हायला नको. "

आनंद आणि खेद हे दोन्ही भाव देवशर्म्यांच्या मनांत एकदम उसळले. त्यांच्या नेत्रांतून आंसवें वाहूं लागलीं. ते म्हणाले, " जशी त्याची इच्छा ! आठ दिवसांनीं कार्तिकी एकादशी आहे. त्यावेळीं सगळींच पुरीस जाऊं. "

* * *

# चार

" सूर्यास्त व्हायला आला ना ? घरीं परतणाऱ्या गोपालांचा कलरव मला ऐकूं येतोय." पांच वर्षांपासून दृष्टि हरपलेली वृद्धा राधादेवी उत्सुकतेनें म्हणाली.

" होय ! तुझें निदान बरोबर आहे." सत्तरीची मर्यादा ओलांडून पलीकडील प्रांतांत पाऊल घातलेल्या भोजदेवानीं उत्तर दिलें.

" मग अजून कसा नाहीं आला ? " वृद्धेचा स्वर शंकेनें थोडा कातर झाला.

" येईल ! " आपली आतुरता झांकीत भोजदेव म्हणाले , " आज आलाच पाहिजे तो. आज अश्विनी पौर्णिमा. आजच येईन, असें त्यानें मला आश्वासन दिलें होतें. त्याचें अध्ययन पूर्ण झालें. गुरुदेवांनीं अत्यंत सन्तुष्ट होऊन त्याचें कौतुकही केलेलें मीं पाहिलें. आजच त्याला पाठवितों, असें तेही म्हणाले होते. येईल तो. "

राधादेवीनें यावर कांही प्रत्युत्तर केलें नाहीं. पण तिच्या मनाचेंही समाधान झालें नाहीं. तिनें आपली काठी उचलली, आणि तिच्या आधारानें ती त्या जीर्ण कुटीच्या बाहेर ओस्र्यावर येऊन येणाऱ्या जाणाऱ्या माणसांच्या पावलांचीं साद घेत बसली.

भोजदेवांनीं राधादेवीचें समाधान करण्याचा प्रयत्न केला खरा. पण वस्तुतः त्यांचेंही अंतःकरण आशंकेनें व्याप्त झालें होतें. नवद्वीपास आज बारा वर्षां-पासून अध्ययनाकरितां जाऊन राहिलेला त्यांचा एकुलता एक लाडका पुत्र जयदेव अध्ययनाच्या समाप्तीनंतर आज परत येणार होता. भोजदेव १०।१५ दिवसांपूर्वीच नवद्वीपाहून बिंदुबिल्वास परतले होते. ते नवद्वीपास जेव्हां जयदेवाच्या गुरुदेवांस भेटले, तेव्हां गुरुदेव त्यांस म्हणाले,

" भोजदेव ! आपल्या कुलाचें नांव आपला पुत्र उज्ज्वल करील ! त्याची गानकला गंधर्वासारखी आहे. त्याची वाणी बृहस्पतीसारखी आहे. त्याची मेधा शुक्राचार्यांप्रमाणें आहे. त्याची प्रज्ञा या दोघांशीं स्पर्धा करणारी आहे. इतकेंही असून त्याचा विनय आणि सौजन्य ब्रह्मर्षि वसिष्ठांच्या तोडीचें आहे. अशा अपूर्व शिष्याचे गुरुस्थानीं बसून मी कृतार्थ झालों ! "

भोजदेवांच्या नेत्रांतून आनंदाची आंसवें ओघळलीं होतीं.

त्यानंतर जयदेव आणि त्याचे गुरुदेव या दोघांच्या मुखांतून आश्विनी पौर्णिमेला जयदेव बिंदुबिल्व गांवी परतणार असल्याचा संकेत ऐकून भोजदेव अत्यानंदित होऊन परतले होते.

परततांना त्यांनीं नाना प्रकारचे संकल्प केले होते.

" आपला पुत्र एवढा विद्वान् होऊन परत येत आहे ! येनकेनप्रकारेण आपण हें वृत्त वंगाधिप महाराज लक्ष्मणसेनांचे कानीं पोंचेल कसें करूं. गुणीजनांचे आधार महाराज लक्ष्मणसेन निश्चितच आपल्या पुत्रास राजधानीस बोलावून घेऊन राजपंडित करतील. महाराज भद्रसेनांप्रमाणें त्यांचा हा पुत्रहि कलाप्रिय आहे.

" जन्माचें दारिद्र्य नष्ट होईल !

" अहा ! सबंध जन्म किती दारिद्र्यांत काढावा लागला !

" पोटभर खाणेंपिणें आणि अंगभर वस्त्रप्रावरणें, या दोन्ही गोष्टी जणूं काय आपल्या ओळखीच्याच नाहींत ! ब्राह्मणाचा जन्म. संचय करायचा नाहीं, असा संकेत !

" संचय करायला अशी प्राप्ति तरी काय झाली ? लहानपणी आजारीपणा-मुळें अध्ययन होऊं पावलें नाहीं. वडिलांच्या पांडित्याच्या पुण्याईवरच जन्मभर चरितार्थ तरी चालूं शकला.

" बरें झालें की पत्नी चांगली समाधानी वृत्तीची मिळाली. नाहींतर फजीतीला पारावर नव्हता !

" एकदां घरांत तांदूळ नव्हते—

" जाऊं द्या झालें ! नवसासायासांनीं जगलेला हा एकुलता कुलदीप असा ब्रह्मवर्चसानें तेजस्वी झाला, आतां तें सगळें दैन्य मिटेल ! आयुष्याच्या शेवटी कां होईना, चांगले दिवस दिसतील !

" दोघें म्हातारा म्हातारी पोराच्या सावलींत राहूं. खायला प्यायला बरें मिळेल. तिच्याच्यानें एवढी कळ निघाली, तर काशीवासही घडेल.

" आणखी काय पाहिजे माणसांना ? अत्यंत बुद्धिमान असा पुत्र महाराज लक्ष्मणसेनांची सभा आपल्या पांडित्यानें गाजवीत आहे, आणि त्याचे कीर्तीचा प्रतिध्वनि ऐकत, गंगेच्या तटाकावर वास्तव्य करीत, रोज सकाळसंध्याकाळ

श्रीविश्वेश्वराचें दर्शन घेत आम्ही दोघें मरणाची वाट शांत मनानें पहात आहोंत !

" वा वा ! सर्वेश्वर कृपाळु आहे ! त्याची इच्छा असल्यास असेंच होईल !

" अगदीं असेंच ! "

या मधुर संकल्पांच्या धुंदींत वाटचालींतले कष्टही भोजदेवांना जाणवले नाहींत. घरीं आल्यावर त्यांनीं राधादेवीला जेव्हां ही वार्ता सांगितली, तेव्हां तर तिला त्या आनंदाचा आवेग सहन होईना ! नेत्रहीन अवस्थेंत तिनें आज पांच वर्षें आपल्या लाडक्या एकुलत्या जयाची वाट पहात काढलीं होतीं. गुरुगृहीं गेल्यावर तो प्रथम एक वर्षानें परत आला, तेव्हां गेलें वर्ष अंतःकरणास पीडा देणारा पुत्रविरह आपल्या सर्व आयुधानिशीं तिच्यासमोर उभा ठाकला.

नऊ वर्षांच्या जयदेवास आपल्या कुशींत लपवून राधादेवी कंपित स्वरानें डोळ्यांतल्या आंसवांस बांध घालीत भोजदेवांना म्हणाली होती, " ऐकलेंत ! "

" काय ? "

" जया आतां नवद्वीपास न गेला तर ? एका वर्षांत त्यानें कल्पनेपेक्षां अधिक अध्ययन केलें आहे. रघुवंशांतले श्लोक तो घडाघडा म्हणतो. पाणिनीचीं सूत्रें तर त्याला अगदीं मुखोद्गत झालीं आहेत. कामापुरतें पौरोहित्यही त्याला येऊं लागलें आहे. बिंदुबिल्व गांव असें काय मोठें नगर आहे ? या लहानशा गांवांतलीं धर्मकृत्यें तो चालवून घेईल. पुरे झालें. अधिक शिकून काय करायचें आहे ? "

एक क्षण भोजदेवांच्याही मनावर या मोहक युक्तिवादानें भुरळ पाडली. पण दुसऱ्याच क्षणीं त्याच्या पाशांतून मोकळें होत भोजदेव म्हणाले, " वा वा ! तुला तुझ्या लेंकरास सोडून रहावेना, म्हणून त्याच्या आयुष्याची कां नासाडी करत्येस ? बिंदुबिल्व गांवाचें पौरोहित्य हें माझ्या मुलास शोभेलसें कृत्य आहे. पण जयाच्या आजोबांच्या नातवास कांही तें निश्चित शोभणार नाहीं ! महामहोपाध्याय धर्मदेवांचा नातू त्यांच्या लौकिकास साजेलशा तेजानें चमकला पाहिजे. "

हें तर राधादेवीलाही पटलें होतें. पण पुत्रस्नेहापोटींच तिचा हा युक्तिवाद जन्मला होता. आपली बाजू उघडी पडलेली पाहून ती किंचित् ओशाळली, आणि म्हणाली, " मला लेंकरास सोडून रहावेना, आणि तुम्ही तरी काय

मोठे विरक्त अहांत ? दिवसांतून दहा वेळां तुम्हीं याची आठवण काढीत असा ! मुलाला नवद्वीपास नेऊन तिथें ठेवून आल्यावर लगेच आठव्या दिवशीं तुम्ही त्याची प्रकृति पहायला निघालां होतांत ! आठवतें का ?"

हात उडवीत भोजदेव म्हणाले, "छे छे ! मी कांहीं नवद्वीपास नव्हतों निघालों ! गंगासागरास जातांना वाटेंत सहज म्हटलें, याचीहि चौकशी करून यावें !"

ही सरळ थाप होती, हें दोघांसही माहीत होतें. तर त्या वेळेस जयदेवाच्या, ही चर्चा ऐकून सुकलेल्या मुखाकडे पाहून कठीण मन करून दोघांनींही त्याला परत नवद्वीपास धाडलें.

दुसऱ्या पाळीला तो दोन वर्षांनीं आठ दिवसांकरितां परत आला. या पाळीला जेव्हां तो जायला निघाला, तेव्हां त्याचा उत्साह असा कांहीं विलक्षण होता, की परत पूर्वीचा प्रस्ताव करण्याचें साहस राधादेवीला झालें नाहीं.

तिसऱ्या खेपेस तो तीन वर्षांनीं परतला. या वेळीं त्याचे अध्ययनाचा अगदीं भर सुरू होता. त्याची आई त्याला भूपवर्मा आणि दुर्गादास या दोघांनीं परस्परांस एक मेकांच्या शेंड्या धरून कसें मारलें, तें सगळें मोठ्या रसाळपणें सांगूं लागली खरी, पण जयदेवास या प्राकृत मारामारीपेक्षां कुमारिलभट्ट आणि महाभिख्खु राहुल शांत्यायन यांच्यांत शून्यवादावर झालेली शाब्दिक लठ्ठालठ्ठीच अधिक आवडायची. वादांत पराजय झाल्यामुळें महाभिख्खु राहुलास आपलीं पिवळीं वस्त्रें सोडून शिखासूत्राचें ग्रहण कसें करावें लागलें, याच कथा जयदेव आपल्या आईस कौतुकानें ऐकवीत असे. त्याचें वादाचें वर्णन ऐकून चाकित झालेली राधादेवी शेवटीं आपलें मोठेपण प्रस्थापित करण्यासाठीं म्हणे, "तरी तुझ्या त्या कुमारी भटाच्या आणि भिक्षूच्या मारामारींत आमच्या तळ्यावर झालेल्या मारामारीएवढी मौज खचितच पहायला मिळाली नसेल ! अरे ! जेव्हां आपल्या पलीकडे राहणाऱ्या कुमुद्वतीनें त्या मैल्या भांडखोर लज्जावतीचे केंस धरून तिला बडवली आहे—"

अस्थानीं एवढा वेळ कवित्व निवेदन केल्याबद्दल स्वतःवरच चिडलेला जयदेव मग आईचें भाषण पुरें न होऊं देतां उठून जाई.

त्या पाळीला जयदेव परत जातांना म्हणाला होता, "बाबा, गुरुदेव म्हणाले, कीं वारंवार घरीं गेल्यानें अध्ययनांत खंड पडतो."

" पण तूं तर कांहीं वारंवार घरीं येत नाहींस ! " आश्चर्यचकित भोजदेव बोलले.

" वारंवार नसेल आलों, तरी तीन वेळां आलोंच की ! गुरुगृहीं अनेक विद्यार्थी एकदां आले, ते अध्ययन संपवून मगच्च घरीं गेले. "

" मग तुझें काय म्हणणें आहे ? "

" मी आतां अध्ययन पूर्ण करूनच घरीं परतेन म्हणतों. "

" जशी तुझी इच्छा ! "

राधादेवीनें जेव्हां जयदेवाचा हा संकल्प ऐकला, तेव्हां क्षणभर तिच्या मनास वेदना झाल्या. पण आतां तिला पुत्रविरह सहन करण्याची संवय झाली असल्यानें ती कांहीं बोलली नाही. तिनें विचार केला,

' मायेची धांव पुढें असते. आतां जयाला शास्त्रचर्चा अधिक चांगली वाटते. वाटूं दे. मी त्याच्या आड येणार नाहीं. '

म्हणून मग पुढील वर्षीं तिला अचानक अंधत्व आलें, तरी तिनें भोजदेवांस आग्रह करून जयदेवास ती वार्ता कळवूं दिली नाही. ती त्यांना म्हणाली, " तुम्ही हें वृत्त त्याला सांगूं नका ! "

" कां ? " आश्चर्यानें स्तंभित झालेले भोजदेव म्हणाले.

" उगीच त्याच्या अध्ययनांत खंड पडायला नको. "

" वा: ! तुला आजिबात दिसेनासें झालें, हें त्याला कळायला नको ? "

" करायचें काय ? तो कांहीं वैद्यक शिकत नाहीं ना ? मग त्याला कळून उपयोग काय ? तो काय वेदांताचीं सूत्रें म्हणून डोळे बरे करणार आहे ? "

" अग पण— "

" ऊं हूं ! नकोच तें ! मुलें पुढें धांवत असतात. थांबणें त्यांना आवडत नाहीं. नवीं नवीं आकर्षणें त्यांना पुढें ओढीत असतात. जयाला अध्ययनाचा छंद लागला. मला त्यांतच आनंद आहे. शिकूं दे त्याला. त्याचें सगळें अध्ययन पूर्ण झाल्यावर मग तो घरीं येईल, तेव्हां त्याला ही वार्ता कळूं दे. "

" अग, तो माझ्यावर रागवायचा नाहीं का ? "

" नाहीं रागवायचा. कदाचित् त्याला थोडेंसें वाईट वाटेल. पण तेवढ्यानें कांहीं मोठीशी हानि होत नाहीं. तो अध्ययनाकरितां गेला, तेव्हां मलाहि खूप वाईट वाटलें होतें. "

मग भोजदेवही पत्नीच्या मनाविरुद्ध वागले नाहींत. पुढील वर्षी ते नवद्वीपास गेले, तेव्हां आई बरी आहे ना, असें जयदेवानें विचारल्यावर क्षणभर घोटाळून ते म्हणाले, “ ऊं ! आई ना ! हो ! बरीच तर काय ! बरी आहे ! ”

“ कां ! बरीच तर काय म्हणजे ? ” शंकाकुल मनानें जयदेव म्हणाला.

“ नव्हे रे ! वार्धक्याच्या तक्रारी ! आतां आम्ही पिकलीं पानें झालों ! कधीं तरी गळून पडायचीं ! ”

कोमेजून जाऊन जयदेवानें विचारलें, “सांगा ना बाबा ! काय होतें आहे तिला ! ”

“ कांहीं नाहीं रे ! तसें कांही विशेष नाहीं, अलीकडे डोळ्यांनीं थोडें कमी दिसूं लागलें. तिला आणि मलाहि. पण त्याबद्दल चिंता करायचें कारण नाहीं. ”

तेव्हां कुठें जयदेव निश्चित झाला. त्या गोष्टीला आतां पुरी पांच वर्षे झाली. या पांच वर्षांतही भोजदेवांनीं राधादेवीची दृष्टि गेल्याची वार्ता जयदेवास कळूं दिली नाही.

ही पांच वर्षे राधादेवीनें मोठ्या निग्रहानें काढलीं. ती तिच्या जयदेवांत झालेला बदल भोजदेवांकडून ऐकूनच आनंद अनुभवीत असे. कारण आतां या जन्मीं तिचा प्रिय जयदेव तिला चर्मचक्षूंनीं दिसणार नव्हता. ती म्हणे,

“ काय हो ? आतां तो खूप उंच झाला असेल नाहीं ? शरीर पुष्टही झालें असेल ? ओंटांवर कोंवळी लवही उगवली असेल ? फार तेजस्वी दिसत असेल, नाहीं ? ”

आणि मग भोजदेवांनीं त्याचें केलेलें वर्णन ऐकून ती आपल्या ज्ञान-चक्षूंसमोर त्याचें चित्र रेखाटीत असे. तिचे अनेक दिवस त्या मधुर, अवीट आनंदांत व्यतीत झाले होते.

पण जेव्हां जयदेव अश्विनी पौर्णिमेस घरीं येणार, आणि पुनः कधींही नवद्वीपास परत जाणार नाहीं, हें तिनें ऐकलें, तेव्हां मात्र एवढे दिवस निग्रहाच्या पाशानें बांधून ठेवलेलें मन दाही दिशांना मोकाट सुटलें. रोज सकाळीं ती भोजदेवांस विचारी, “ काय हो, आज कोण तिथि ? पौर्णिमेस किती दिवस राहिले ? ”

एकीकडे भोजदेव तिच्या आतुर भावाची थट्टा करीत खरे, पण त्यांच्या आतुरतेलाही कांहीं पार नव्हता. राधादेवी सकाळीं तिथीची चौकशी करी, तर भोजदेव सायंकाळीं एक तिथि पार पडल्याचें समाधान मानीत.

शेवटी एकदांची पौर्णिमा उगवली. त्या दिवशीं अरुणोदयापूर्वी प्रहरभर रात्रीसच राधादेवी आपल्या अंथरुणावर उठून बसली आणि म्हणाली, " ऐकलेंत ! सूर्योदय व्हायला आला."

" छे ग ! अजून अरुणोदयासच एक प्रहर अवधि आहे." जागे असलेले भोजदेव म्हणाले.

" एक प्रहर आहे का अजून ! आज अरुणोदय उशिरां होणार आहे वाटतें !"

" अरुणोदय अगदीं रोजच्या वेळेवरच होणार आहे. तूंच अधीर झाली आहेस, आणि अरुणोदयाला बिचाऱ्याला उगीचच नांवें ठेवीत आहेस. तुमच्या इच्छांप्रमाणें अरुणोदय आपल्या ठरलेल्या वेळा बदलूं लागला, तर अनर्थच व्हायचा ! तूं अरुणोदय लवकर व्हावा असें म्हणतेस; तर प्रियकराच्या सहवासाचें सुख अनुभवीत असलेली एखादी मदालसा एवढ्या लवकर अरुणोदय झाल्याबद्दल त्याला शाप द्यावयाची ! एकूण स्त्रियांची जात अधीरच, यांत शंका नाहीं !"

भोजदेवांनीं केलेल्या या परिहासानें वृद्ध राधादेवीचें वार्धक्याच्या क्षेत्रांत विलीन झालेलें तारुण्य क्षणभर जागें झालें. ज्या स्वरांत भोजदेवांनीं आपलें भाषण संपविलें, त्याच स्वरांत राधादेवी म्हणाली, " अहा ! भारीच अधीर बरें का स्त्रियांची जात ! पुरुष मात्र सगळे निर्मोही ! एका निर्मोही वृत्तीच्या वृद्धाचा पुत्र आज येणार आहे. पण रात्रभर तो निर्मोही जो जागा होता, तो कांहीं आपल्या पुत्राच्या आगमनासाठी आतुर झाला म्हणून मुळींच नव्हे. परमात्मचिंतनांत निमग्न असल्यानें त्याला झोंप आली नाहीं. आणि तो जो सबंध रात्रीत तीनदां बाहेर जाऊन अरुणोदयास किती वेळ आहे तें पाहून आला, तें केवळ त्या तारकागणांस आपल्या कृपामृतदृष्टीनें चिरंजीव करण्यासाठींच !"

यानंतर दोघेंही पोट धरधरून हंसलीं. मग जयदेवाच्या आगमनप्रसंगीं काय काय करायचें, तें ठरवीत तीं दोघें अंथरुणांवर पडून राहिलीं.

सबंध दिवसही असाच आतुरतेंत गेला. अंधा राधादेवी बसल्याबसल्या स्वयंपाक कसा करायचा तें भोजदेवांस सांगत होती. भोजदेवही तिच्या आदेशाचें पालन करण्याचा यथामति प्रयत्न करीत होते. पण लक्ष दुसरीकडे गुंतलेलें असल्यामुळें भाताची त्रिपुटी झाली, कांहीं पोळ्यांस खग्रास ग्रहण लागलें, तर कांहीस कंकणाकृति. जेवायल्या बसल्यावर दोघांनाही आढळून आलें, कीं एकाही भाजींत मीठ टाकलेलें नाहीं !

हळूंहळूं संध्याकाळ झाली. राधादेवीनें जयदेव येणार असल्याची वार्ता शेजाऱ्या-पाजाऱ्यांस अगोदरच सांगून ठेवली होती. त्यामुळें सायंकाळीं आजूबाजूच्या भामिनी, इन्दिरा, वसुमती, विद्यावती या मोठ्या उत्सुकतेनें राधादेवीकडे येऊन बसल्या होत्या. त्या सर्वांस जयदेवाच्या विद्वत्तेचें आणि त्याच्या सौंदर्याचें वर्णन तऱ्हेतऱ्हेनें राधादेवींच्या तोंडून ऐकावयास मिळालें.

पण सूर्यास्त व्हायला आला, तरी जयदेव मात्र आला नाहीं. मग एकेक जण दुसरे दिवशीं सकाळींच येण्याचें आश्वासन देऊन घरोघर गेली.

जसजसा वेळ जात चालला, तसतशी राधादेवीच्या मनांतली आतुरता भयाच्या छायेनें झांकोळून जाऊं लागली. तिच्या मनांत अशुभ नाना रूपें धारण करून थैमान घालूं लागलें. शेवटीं सूर्यास्त झाला. तिनें भयविव्हल मनानें भोजदेवांस प्रश्न केला.

भोजदेवांच्या उत्तरानें समाधान न झालेली राधादेवी बाहेर जाऊन माणसांच्या पावलांची साद घेत बसली. प्रत्येकाच्या पावलांचा कानोसा घेत ती मनाशीं म्हणाली, ' हा रुद्रवर्म्याचा आवाज ! परवां तो पुरीस गेला होता. आतां बहुधा परतलेला दिसतोय्. तोच तो.

' हे चंडसेन आणि यशोवर्मा मदिरा प्राशन करून भांडत येत आहेत. रोजच ते असेच भांडत जातात, आणि घरीं जाऊन बायकांस मारतात !

' हा बहुधा रुद्रदामन् असावा. होय, मी त्याचें एक पाय घाशीत चालणें बरोबर ओळखतें. रेशमी वस्त्रांचा व्यापार करणारा हा माणूस शहरांत कां जात नाहीं ? इथें खेड्यांत त्याची रेशमी वस्त्रें कोण घेणार ?

' ही मेना गोपी. तिच्यामागें धांवत असलेलें तिच्या गाईचें वांसरूं. रोज ती गाईचें दूध काढायला या मार्गानेंच जाते.

' पण जयाचीं पावलें अजून कां ऐकूं येत नाहींत ?

' कीं पौर्णिमा आज नसून उद्यां आहे ? या मेल्या चंद्राचें कांहीं नक्की नसतें. कधीं कधीं आजची पौर्णिमा उद्यांवरही जाते.

' पण नक्कीच आज पौर्णिमा आहे. हीं शेजारचीं पोरें दूध मिळवण्यासाठी धडपड करीत धांवत असलेलीं ऐकूं येत आहेत. आज रात्री सगळें दूध पितील. मीही जयासाठीं दूध घेऊन ठेविलें आहे. तो आल्यावर त्याला प्यायला देईन.

' अगोदर नाहीं द्यायची. आल्याबरोबर त्याला दारांतच थांबवीन. त्याच्या पायांवर दूधपाणी घालीन. त्याच्यावरून दहींभात ओंवाळून फेंकून देईन, मग त्याला आंत येऊं देईन.

' चालून चालून माझें पोर अगदीं दमलें असेल—

' हा ग्रामरक्षक महामणि चालला आहे वाटतें ! आपल्या खड्गाची धार बसल्याच्या गोष्टी करतोय ! होय. तोच तो.

' तर काय म्हणत होत्यें ? हो ! माझें पोर दमलें असेल. त्याचे पाय तेल लावून चांगले चोळीन. मग यांच्याकडून पाणी तापवून घेऊन चांगलें शेकत त्याच्या पायांवर घालीन. मग ते चांगले कोरड्या वस्त्रानें पुसून काढून मी त्याला देवघरांत देवांस नमस्कार करावयास नेईन.

' रात्रीं स्वयंपाकही मीच करीन. यांना नाहीं करतां येत ! काय भाजी केली होती दुपारीं ! अहाहा ! अशी भाजी कुणी तोंडासही लावणार नाहीं ! मीच करीन आपल्या हातानें. आंधळी झाल्यें म्हणून काय झालें ! एवढ्या वर्षांची संवय आहे, जयाला मदतीला घेऊन मीच करीन सगळें.

' नाहीं तर त्यालाच करायला लावीन. एवढा शिकला माझा पोर, भाजी करतां येणार नाही का त्याला ?

' पण नको गडबाई ! माझें लेंकरूं दमून येईल, त्याला का स्वयंपाक करायला लावायचा ? मीच करीन ! असा काय मोठा स्वयंपाक करायचा आहे ?

' पण हा अजून कां नाहीं आला ? आतां तर—

अग्गो बाई ! देवळांतला शंखनाद की काय हा ? आरती होत्येय् वाटतें ? अजून हा नाहीं आला ! की वाटेंत कांही— '

अनिष्ट शंकेनें राधादेवीचें मन बावरलें. ती तशीच धडपडत उठली, आणि चांचपडत घरांत गेली.

आंत भोजदेव संध्या करण्याकरतां समोर पंचपात्र आणि ताम्हन घेऊन बसले होते. तोंडानें उपस्थानाचे मंत्रही पुटपुटणें चाललें होतें. पण आग्नेय दिशेस अग्नीला नमस्कार करतांना त्यांच्या अन्तःचक्षूंसमोर अग्नीऐवजीं त्यांचा लाडका मुलगाच उभा रहायचा !

राधादेवी आंत येऊन बावरलेल्या स्वरानें म्हणाली, " ऐकलंत ? "

" काय म्हणत्येस ? "

" सगळ्या देवळांतून शंख अन् घंटा गरजताहेत ! प्रहर रात्र व्हायला आली. अजून हा आला नाहीं !

" शत्रूही कल्पना करणार नाहीं, त्या मन करीत असतें ! मी म्हणतें, याला वाटेंत कुठें अडथळा झाला, की कोणीं कांही—"

" हरि हरि ! संध्याकाळची वेळ आहे, कांहीं तरी बोलूं नकोस ! देव दयाळु आहे ! लांबची वाटचाल ! येईल तो. त्याला कोण काय करणार ? दरिद्री ब्राह्मणाचा मुलगा तो !"

राधादेवीनें देवघराकडे तोंड करून दोन्ही हात जोडले. ती म्हणाली, "प्रभु दयाळु आहे ! पण तुम्ही असें कां नाही करीत ? "

" काय करूं ?"

" जरा या इथवर जाऊन पाहून कां येत नाहीं ? रात्रींची वेळ. आज सहा वर्षांनीं माझें पोर घरीं येणार. वाट चुकलें तर ? या ना पाहून ! "

" हा निघालोंच बघ ! "

भोजदेवांनीं घाईघाईनें संध्या आवरली, आणि हातीं भला मोठा सोटा घेऊन पायांत खडावा अडकवीत ते निघाले. राधादेवी परत तिच्या जागीं येऊन माणसांची चाहूल घेत बसली.

जसजसा वेळ जाऊं लागला, तसतसा तिचा धीर सुटत चालला. हळूं-हळूं माणसांची वाटचाल बंद झाली. गांवाऱ्या एका बाजूस असलेल्या त्या जीर्ण कुटीरांत एकटी अंध राधादेवीच धडधडत्या व्याकुळ अंतःकरणानें सगळे प्राण कानांत आणून बसून राहिली.

एकदम तिला वाटलें, कीं खडावांचा ध्वनि ऐकूं येत आहे. ती तटकन् उठून उभी राहिली, आणि साक्षेपानें त्या ध्वनीचें पृथक्करण करूं लागली.

अगदीं मंदमंद पावलें टाकीत भोजदेव घराकडे परतत होते. त्यांच्याबरोबर दुसरें कोणीही नव्हते.

ते घरापाशीं आले, तोंच त्यांना कातर स्वरानें मारलेली राधादेवीची हांक ऐकूं आली, " जया ! रे माझ्या जया ! "

उदासपणें कुटीराच्या ओश्यावर खचल्यासारखे बसत भोजदेव म्हणाले, " अजून नाहीं आला जया ! "

धाडकन् म्हातारी खालीं कोसळली. भोजदेवांनीं घाईघाईनें उठून तिला सांवरलें. ओश्याचा दगड लागून म्हतारीच्या डोक्यास भली मोठी जखम झाली असून तींतून रक्त वहात होतें. भोजदेवांनीं तिला उचलून आंत नेलें, व ते तिची जखम बांधूं लागले.

वृद्धा राधादेवी रडत म्हणाली, " मला नका करूं उपचार ! माझ्या लेंकराला पहा जाऊन ! आई ग ! काय झालें ग माझ्या वांसराला ? "

भोजदेव तिला समजाविण्याचा यत्न करूं लागले खरे, पण त्यांचेंही हृदय भरून आलें. आतां या वेळीं जयदेवाचा तपास करायला कुणाला पाठवायचें म्हटलें, तरी तें अशक्य होतें. दुग्धपानाचा आनंद सोडून भोजदेवांच्या मुलाचा तपास करायला कुणी जाण्यास भोजदेव काय ग्रामपति थोडेच होते ? ते होते एक दरिद्री ब्राह्मण !

राधादेवी अस्फुट स्वरांत रडतच होती. त्यामुळें बाहेरची चाहूल लागेना. अचानक एक व्यक्ति दारांत येऊन उभी राहिली, आणि म्हणाली, " आई ! मी आलों आहें ! "

* * *

## पांच

ती हांक कानीं पडतांच राधादेवीला वाटलें, कीं जणूं काय कुणीतरी अमृताचे घटच आणून तिची तृषा शमन करीत आहे. सहस्रावधि वर्षांपासून लागलेली भूकच जणूं काय त्या रसाच्या आकंठ पानानें शांत होत आहे. वर्षानुवर्षें पावसाचा थेंबही न पडल्यानें उरीं फुटलेली भूमीच जणूं काय मृगाच्या भल्या टपोऱ्या थेंबांनीं तृप्त होत आहे!

ती खडबडून उठून बसली. त्या ध्वनीच्या अनुरोधानें तिनें आपले शुष्क हात पसरले, आणि ती म्हणाली, " जया! माझ्या जया रे! खरेंच का तूं आला आहेस? ये! असा माझ्या कुशींत ये!"

जयदेव पुढें झाला. त्यानें आपल्या खांद्यावरील पडशी एका बाजूस ठेऊन दिली, व वडिलांस जाऊन नमस्कार केला. वडिलांनीं त्याला घट्ट पोटाशीं धरलें, आणि अस्फुट स्वरांत ते कांहींतरी पुटपुटले. कांहीं क्षणांनंतर जयदेव त्यांच्या त्या स्नेहपाशांतून सुटून आईसमोर गेला, आणि त्यानें तिला नमस्कार केला. हृदय भरून आल्यानें त्याच्या मुखांतून एक अक्षरही बाहेर पडलें नाहीं.

पण राधादेवीचे हात अजून तसेच पसरलेले होते! ती आपल्या वांसराची वाट पहात होती. जयदेवानें पाहिलें कीं तिचें आपण केलेल्या क्रियांकडे मुळींच लक्ष नाहीं. ती कुणीकडे तरी पहात आहे!

राधादेवी क्षुधाव्याकुल होऊन बसली होती. तिच्या मस्तकांतून वहात असलेलें रक्त अजून थांबलें नव्हतें. एवढा वेळ जयदेवाची वाट पाहून ती म्हणाली, " जया! कां रे येत नाहींस? रागावलास हो रे वांसरा?"

एका अंधुक जळणाऱ्या दीपाच्या प्रकाशांत आईकडे निरखून पहात जयदेव म्हणाला, " हा काय तुझ्या पुढें उभा आहें ना मी!"

" कुठें आहेस?" हातांनीं पुढें चांचडत राधादेवी म्हणाली, " माझ्या हातांना लागत कसा नाहींस?"

आश्चर्यातिरेकानें आईचें मुख आपल्या हातांनीं उचलून त्याकडे निरखून पहात जयदेव म्हणाला, " आई, तुला दिसत नाहीं? अजिबात दिसत नाहीं?"

आपल्या कृश हातांनीं जयदेवाला ओढून त्याला घट्ट मिठी मारीत आणि त्याच्या मुखावरून हात फिरवीत राधादेवी म्हणाली, " नाहीं दिसत? म्हणत होत्यें, कीं गुरुदेवांजवळ संपूर्ण विद्याध्ययन करून आलेलें माझें लेकरूं डोळे भरून पाहीन ! पण—! जाऊं दे ! जया, खूप मोठा झालास रे तूं ! "

जयदेवाचें लक्ष आईच्या बोलण्याकडे नव्हतें. तो आईचें मुख निरखून पहात होता. त्याला तिच्या भालप्रदेशीं झालेली ती जखम दिसतांच आपल्या धोतरानें तें रक्त टिपून काढीत जयदेव घाईघाईनें म्हणाला, " आई ! काय लागलें तुला ? किती वेळ लोटला ? "

" लागलें आहे ? कधीं लागलें ? मला नाहीं माहीत तें ? "

" वाः ! हा बघ,मस्तकावर व्रण झाला आहे ! चांगला यवाएवढा आहे बघ !"

" लागूं दे ! माझें काय म्हातारीचें ? कधीं तरी आतां शरीर पडायचेंच. पण एवढा विलंब कां लागला रे तुला ? "

आईच्या कुशींतून उठून जयदेवानें आपलें पडशीवर ठेवलेलें उत्तरीय टर्‌कन् फाडलें, आणि तिच्या मस्तकावर त्याचा बंध बांधीत तो म्हणाला, " तें मग सांगेन. अगोदर तूं सांग बघूं ? तुला दिसेनासें केव्हांपासून झालें ? "

" झालीं चार पांच वर्षे. "

स्तंभित होऊन क्षणभर जयदेव उगाच राहिला. मग तो भोजदेवांकडे वळून त्यांना म्हणाला, " बाबा, आपण हें मला कां सांगितलें नाहीं ? "

" तें तिलाच विचार ! ती नको म्हणाली. मी तुला सांगणारच होतों. पण तिनें मल शपथ घातली होती ! "

" आई ! " राधादेवीचे खांदे धरून जयदेव तिच्याकडे केविलवाण्या दृष्टीनें पहात म्हणाला, "हें असें कां केलेंस तूं ? सांग ना ? मला कां कळूं दिलें नाहीस ?"

त्याचें मुख कुरवाळीत राधादेवी म्हणाली, "अरे, मी म्हटलें, उगीच तुझ्या अध्ययनांत विक्षेप यायला नको. माझ्या अंधत्वाची वार्ता ऐकून तूं चलितचित्त व्हायचास ! म्हणून सांगितलें नाहीं झालें ! विचार केला, कीं याला कळलें, तरी काय होईल ? हा कांहीं तिथून येऊन मला नेत्रदान तर करूं शकणार नाहींच ! मग उगीच त्याला कळवून त्याच्या मनांत भ्रम कशाला निर्माण करा ? "

आईचा तो संयम, ती त्यागभावना स्वतः अनुभवून जयदेवाच्या मनांतील

तिच्याविषयींचा आदर शतगुणित झाला. त्यानें आईला घट्ट मिठी मारली आणि तो म्हणाला, " आई ! माझी फार थोर मनाची आई ! "

बराच वेळ तीं दोघें त्याच अवस्थेंत राहिलीं. राधादेवीच्या दर्शनशक्तिहीन नेत्रांतून जयदेवाच्या शरिरावर सारखा अभिषेक होत होता. शेवटीं भोजदेव म्हणाले, " अरे जया ! ऊठ ना ! भूक नाहीं लागली कां तुला ? जेवून घ्या आणि मग मायलेंकरें खुशाल आंसवें ढाळीत बसा ! "

" अगबाई ! मी विसरल्येंच होत्यें ! जया, तुला भूक लागली असेल नाही रे ? केव्हां जेवला होतास कोण जाणे ! ऊठ, तुला स्वयंपाक करून घालत्यें. तुझ्याकरितां दूध ठेवलें आहे मीं घेऊन. आज कोजागिरी पौर्णिमा ना !"

जयदेव आईच्या कुशींत लपविलेलें आपलें प्रशस्त ललाट उचलीत म्हणाला,

" दूध मग पिईन. पण तूं स्वयंपाक कसा करशील ? "

" कां ? मग कोण करील ? हे कांहीं स्वयंपाक चांगला करीत नाहींत. आज दुपारीं काय झालें,—"

दुपारच्या स्वयंपाकाचा वृत्तांत राधादेवीनें हंसत हंसत सांगितला आणि मग म्हणाली, "तूं बैस माझ्या शेजारीं. आत्तां चांगला छानदार स्वयंपाक करत्यें बघ ! "

" वावा ! तुला समोर उभा असलेला मी दिसेना मघाशीं ? अन् स्वयंपाक कसा करशील ? असूं दे. मला बघ, आतां छान स्वयंपाक करतां येऊं लागला आहे. महामहोपाध्याय गंगाभट्ट परवां पाटलीपुत्रास मला बरोबर घेऊन गेले होते. त्या पाळीला त्यांचा स्वयंपाक मीच करीत असें ! "

" अग्गोबाई ! खरें का ? " आश्चर्य वाटून राधादेवीनें विचारलें, "म्हणजे तुझ्या पाठशाळेंत शिकवितात तरी काय काय ? "

हंसून उठत जयदेव म्हणाला, " आतां बघ काय काय शिकलों आहें तें !'

जयदेवानें झोंपडीबाहेर चांदण्यांत जाऊन भोंवतालच्या बालपणींच्या स्मृतिचिन्हांकडे एकदां डोळे भरून पाहून घेतलें. नंतर कूपावर जाऊन हात-पाय धुवून तो स्वयंपाकघरांत आला. आंधळ्या आईचें न ऐकतां त्यानें चूल पेटाविली, आणि स्वयंपाकाचें साहित्य काढून स्वयंपाकास प्रारंभ केला.

भोजदेव कृतज्ञतेचा आनंद उपभोगीत आपल्या बटकावर दोन्ही हात

मागें घेऊन बसून राहिले. राधादेवी स्वयंपाकघराच्या दारांत बसून जयदेवाच्या पांडित्याची खोली अजमावूं लागली.

" काय काय शिकलास रे जया ? "

" मी ना ? काव्य शिकलों, स्मृति शिकलों, वेदान्त शिकलों, संहिता म्हटल्या, न्याय पढलों व सांख्य शिकलों, 'दर्शनरत्न' ही उपाधि मिळविली —"

जयदेवाच्या त्या सूचींतील सर्व विषय कांहीं राधादेवीच्या डोक्यांत शिरूं शकले नाहींत. जेवढे शिरले तेवढयाविषयी स्वतःचें ज्ञान प्रगट करीत ती म्हणाली, " स्मृति म्हणजे आठवणी ना ? गुरुजींनीं आपल्या लहानपणच्या आठवणी सांगितल्या असतील ! "

हंसूं दाबीत जयदेव म्हणाला, " होय ! "

" ऊंः ! त्यांत काय आहे मोठेंसें ? तुझ्या गुरुजींपेक्षां मी अधिक वडील आहें. मला कितीतरी आठवणी माहीत आहेत. माझ्या लहानपणी जेव्हां आमचे ग्रामाधिपति काशीयात्रेला गेले, तेव्हां त्यांनीं आपली पालखी वाहायला चांगल्या सुंदर मुली ठेवल्या होत्या. तर काय झालें– "

स्मृतिशास्त्रांतील आपल्या आईचें तें अगाध ज्ञान पाहून जयदेवास हंसूं आवरेना खरें, पण कसा तरी त्याला बांध घालीत तो म्हणाला, " वा वा ! आई तुला आमच्या गुरुदेवांपेक्षां पुष्कळच आठवणी माहीत आहेत. माझ्या मनांत तुझ्या आठवणीविषयीं थोडीशीही शंका राहिली नाहीं. "

आपल्या भाषणांत मुलानें निर्माण केलेला हा अडथळा न रुचून राधादेवी म्हणाली, असूं दे ! तर तुला उशीर कां झाला तें नाहीं सांगितलेंस ? "

खो खो हंसत जयदेव म्हणाला, " अग, तुझा हा पुत्र साहित्यदिक्पति झाला ना ! "

म्हणजे काय ? " उत्सुकतेनें राधादेवीनें विचारलें.

" म्हणजे कांहीं नाहीं. मनुष्य साहित्यशास्त्रांत प्रवीण झाला—"

" कोण ? तूं झालास प्रवीण ? अग्गो बाई ? सांग तर रे ! शंभर माणसें जेवायचीं आहेत, तर साहित्य किती लागेल ? "

आपला पराभव मान्य करीत जयदेव म्हणाला, " छे छे ! त्या साहित्यशास्त्रांत

तुझा हात कोणीच धरूं शकणार नाहीं. मी म्हणतों हें साहित्य म्हणजे वाङ्मयीन साहित्य."

"अग्गो बाई! त्यालाही साहित्यच म्हणतात का?"

"होय. तर त्या शास्त्रांत मनुष्य प्रवीण झाला, म्हणजे त्याला उपाधि देतात कांहीं तरी. मला 'साहित्यदिक्पति' ही उपाधि मिळाली."

"असें होय! तर मग काय झालें?"

"वाटेंत शूर्पारक गांवीं अम्बिकाशरण भट्टाचार्यांनीं अडविलें, ते येऊंच देईनात! म्हणाले, एवढा विद्वान मनुष्य आमच्या गांवांतून तसाच जावा, हें कांहीं बरें नाहीं! मग दुपारीं तिथें भोजन करून प्रवचन करावें लागलें."

"किती मंडळी जमली होती प्रवचनाला रे?"

"होती दोन अडीच सहस्र."

दोन सहस्र मंडळीसमोर फाडफाड बोलणाऱ्या आपल्या साहित्यदिक्पति मुलाविषयीं राधादेवीचें मन गर्वानें भरून आलें. ती हरखून जाऊन म्हणाली, "तूं बोलायला भ्यायलास तर नाहीं ना?"

"छे छे! तुझें स्मरण केल्यावर मग भीति पळून गेली."

उद्यां सकाळीं सगळ्या शेजारणीपाजारणींना आपल्या पुत्राच्या दिग्विजयाची ही वार्ता कथन करण्याचा निश्चय करीत राधादेवी जेवायला बसली. जेवतांना किंचित् वाईट वाटून ती म्हणाली,

"काय कर्म आहे माझें! आज लेंकरूं आलें आहे! तर त्याला जेवायला स्वतः करून वाढायचें! ती आपली त्यानें केलेला स्वयंपाक गिळीत बसल्यें आहें!"

जयदेव आईला मध्येंच अडवीत म्हणाला, "तें असूं दे आई. बाबा, सांगा तर! भात चांगला झाला आहे ना?"

प्रसन्न मनानें जेवत असलेले भोजदेव म्हणाले, "फार चांगला झाला आहे."

"आई, पोळ्या कच्च्या राहिल्या नाहींत ना?"

"नाहींत रे बाबा! तूं माझाच मुलगा आहेस ना! कच्च्या कशा ठेवशील?"

जेवण संपत आल्यावर बराच वेळ राधादेवीच्या डोक्यांत घोळत असलेला विचार तिनें बोलून दाखविला. ती म्हणाली, "बेटा! स्वयंपाक तर फार

चांगला केलास. पण तूं किती दिवस असा स्वयंपाक करशील ? "

" कां ? "

" नव्हे रे ! किती केलें तरी हें काम स्त्रियांचें. "

" म्हणजे माझा स्वयंपाक कांहीं तुला आवडला नाहीं ! " जयदेव हंसत म्हणाला.

" आवडला तर ! आवडला नाहीं कसा ? पोळी वाढ मला अर्धी ! " गडबडीनें राधादेवी म्हणाली, " फारच छान पोळ्या केल्या आहेस तूं. पण मी म्हणत्यें, तूं स्वयंपाक करशील, कीं मिळवून आणून आमचा चरितार्थ चालवशील ? "

" दोन्ही करीन. "

" नको ग माझी बाई ती ! त्यापेक्षां एखादी चांगलीशी मुलगी बघून घरांत आणीनास कां ? "

" मुलीऐवजी एखादी म्हातारी स्वयंपाकीण आणली तर ? मुलगी नासधूस करील ! म्हतारी नीटनेटकेपणें सर्व स्वयंपाक करीत जाईल ? "

" जळलें त्या म्हातारडीचें तोंड ? " त्या कल्पनेंतल्या म्हातारीला शिव्या देत राधादेवी म्हणाली, " करायची काय म्हातारी ? त्यापेक्षां मींच चांगला स्वयंपाक करीन ! "

" मग तूंच करीत जा. " जयदेव थट्टेच्या स्वरांत म्हणाला.

" नव्हे रे ! मी म्हणत होत्यें, मला सून केव्हां आणणार तूं ? "

" करायची काय सून ! "

" वा रे वा ! "

" नव्हे तर काय ! तुला कांहीं सूनमुख पहातां यायचें नाहीं. मग कशाला सून आणूं ? "

" न कां पहातां येईना ! मी आपली तिच्या तोंडावरून हात फिरवूनच तिला आशीर्वाद देईन. "

" तुझा रुक्ष हात तोंडावरून फिरल्यावर तुझी सून जी माहेरीं पळून जाईल, ती परत यायचीच नाहीं ! "

" माझी सून असें नाहीच करायची मुळीं ! मग केव्हां आणशील ? "

भोजदेव आतांपर्यंत कांहीं बोलले नव्हते. आतां ते म्हणाले, " आजच तर

तुझा मुलगा घरीं आला आहे. लगेच हात धुवून त्याच्या मागें काय लागलीस ? त्याला थोडी विश्रांति घेऊं दे. आपल्या सख्यासोबत्यांना भेटूं दे. मग सावकाशपणें सून आणायचा विचार पाहूं. "

ओशाळून राधादेवी म्हणाली, " आजच मी कांहीं त्याला सून आणायला सांगत नाहीं ! आपलें सूतोवाच करून ठेवलें. "

मग तो विषय तिथेंच थांबला.

भोजदेवांचा जया अध्ययन संपवून परत आला, ही वार्ता दुसरे दिवशी सकाळीं वावटळीच्या झपाट्यासारखी त्या लहानशा बिंदुबिल्व गांवांत पसरली. एवढी महत्त्वाची गोष्ट घडल्यावर मग गांवकरी लोकांना आपापलीं कामें थांबवून जयदेवाच्या विद्वत्तेची परीक्षा घेणें भागच होतें.

नित्यनियमाप्रमाणें जयदेव ब्राह्ममुहूर्तीं उठून गांवाशेजारीं असलेल्या वेदा नदीवर प्रातःकर्में उरकून जो घरीं येतो, तों त्याला आपलें कुटीर आणि त्याच्या आसमंतांतला भाग स्त्रीपुरुषांनी भरून गेलेला दिसला.

आपला मुलगा साहित्यदिक्पति उपाधि मिळवून परत आला ही वार्ता राधादेवीनें मोठ्या उत्साहानें सगळ्या गांवकऱ्यांस ऐकवून टाकली असल्यानें निरनिराळीं माणसें मोठ्या उत्सुकतेनें जयदेवाची वाट पहात बसलीं होती.

जयदेव आल्याबरोबर सगळे मोठ्या उत्साहानें पुढें सरसावले, आणि जयदेवावर त्यांनीं प्रश्नांची सरबत्ती उडविली.

" यावें साहित्य प्रान्तपति ! " रुद्रदामन् जयदेवाविषयीं शक्य तितका आदर प्रगट करीत म्हणाला, " कुशल तर आहे ना ? "

" अहो श्रेष्ठी ! त्यांची उपाधि साहित्य प्रान्तपति नसून साहित्य दुष्पति आहे ! " अभिराम म्हणाला. याचें त्या लहानशा गांवांत सुती कापडाचें एक दुकान होतें.

"पुरे हो ! साहित्य दुष्पति असो कीं साहित्य दुर्मति असो ! त्यांत काय आहे ? आशय कळला कीं झालें ! तर नवद्वीपचे ते श्रेष्ठी प्रियत्पति बरे आहेत ना ? बाली द्वीपाहून माझी रेशमाची नौका आल्यावर त्यांच्याच तर्फे विकली गेली होती. अरे हो ! तुम्हांला नौकानयन शास्त्राची माहिती झालीच असेल ? "

" नाहीं ! " जयदेवानें उत्तर दिलें.

" नाहीं ? " तुच्छतेनें हंसत रुद्रदामन् म्हणाला, " मला वाटलेंच होतें.

ते तुमचे नवद्वीपांतले पंडित माझे चांगल्या ओळखीचे आहेत! उगीच निरुपयोगी घटापटा शिकवीत असतात! त्यापेक्षां त्यांनीं व्यापारशास्त्र शिकविणें सुरू केलें, तर त्यांच्याकडे मी पन्नास विद्यार्थी पाठवून देईन, "

" पुरे हो तुमचें! " रुद्रदामनास थांबवीत यशोवर्मा पुढें होऊन म्हणाला, " नसतील जयदेव तुमचें नौका हांकणें शिकले! प्रत्येक जर व्यापार करूं लागला, तर मग ग्राहक कोण होईल? तर काय हो जयदेव? तुम्ही वेद शिकलांत नाहीं का? "

" होय! थोडासा शिकलों आहें. "

" थोडासाच का? " निराश होत यशोवर्मा म्हणाला, " बरें. थोडासाच कां होईना! तर वेदांत मदिरासूक्तें नांवाचीं सूक्तें आहेत, तीं तुम्हीं म्हटलींच असतील? "

" मीं म्हटलेल्या संहितांत मदिरासूक्त कुठें आढळलें नाहीं. " जयदेवानें हंसू दाबीत उत्तर दिलें.

" जाऊं दे रे! जयदेवासारख्या लहान मुलाकडून आम्हीं एवढ्या मोठ्या विद्वत्तेची अपेक्षा करूं नये. " चंडसेन आळस देत म्हणाला.

" वा: ! तुला काय कळतें विद्वत्तेतलें! " यशोवर्मा सूर चढवीत म्हणाला, " रोज मदिरा पिऊन मत्त होणारा तूं! "

" तर तर! आणि तूं काय कलालाच्या घरीं जाऊन दूध पितोस वाटतें? "

" मी मदिरा पितांना मदिरासूक्तें म्हणत असतों. त्यानें मदिरापानाचा दोष नाहींसा होतो. काय हो जयदेव, कमींत कमी एवढें तरी माहीत आहे ना तुम्हांला? "

" वेदांत मदिरापानाचा निषेध केलेला मला माहित आहे." जयदेव म्हणाला.

" अरे! तर मग तुमचा गुरु कोणीतरी अर्धवट शिकलेला असला पाहिजे!" उठत यशोवर्मा म्हणाला.

धोल्र कोव्याला हें मुळींच आवडलें नाहीं. तो म्हणाला, " हे यशोवर्मा आणि चण्डसेन रोज मदिरा पितात आणि भांडत असतात. जयदेव, हे नेहमींच त्या तारेंत असतात! तुम्ही त्यांच्याकडे लक्ष देऊं नका. एवढीं वर्षें नवद्वीपास शिकून आलेला मुलगा, अन् त्याच्या पुढें हे दोघे दारुड्ये आपलें पांडित्य दाखवितात! जयदवेपंडित, ही माझी नाडी बघा पाहूं! आज कितीतरी

दिवस मला मासे खावेसे वाटत नाहींत. वैद्यशास्त्र तर तुम्हांला निश्चितच येत असेल, नीट पाहून असें छानदार औषध सांगा एखादें! रसायन सांगितलेंत तरीही चालेल."

"मला नाडींतलें कांही कळत नाहीं." जयदेव म्हणाला.

"नाहीं कसें? कळतच असेल!" धोन्द्र अविश्वास प्रगट करीत म्हणाला.

"खरोखरच मला वैद्यकशास्त्रांतलें कांहीं माहीत नाहीं."

"तुम्हांला वैद्यशास्त्रांत नाडीशास्त्र शिकविलें नाहीं!"

"मी वैद्यकच शिकलों नाही!"

निराश होत धोन्द्र म्हणाला,

"तुमचा कांहीं दोष नाहीं त्यांत. हे पंडित सगळी विद्या शिकवीतच नाहीत."

"माहीत आहे तुला? त्यांच्या गुरूनें त्यांना तशी शपथच घातलेली असते. माझ्या गुरूनें नव्हे? सर्पविष उतरविण्याचा सगळा मंत्र कांहीं मला शिकविला नाहीं!" मंड तांबोळी म्हणाला.

तात्पर्य अशा प्रकारें जयदेवाची परीक्षा झाल्यावर बहुधा सगळे लोक उठून आपापल्या उद्योगास निघून गेले. केवळ जयदेवाचे बाळपणींचे मित्र काय ते त्याच्या तपोदग्ध शरिराकडे कौतुकानें पहात त्यास जिज्ञासेनें नाना प्रश्न करीत राहिले.

तोंच हातींच्या दंडाचा आधार घेत वृद्ध भट्ट हरिप्रिय खोकत खोकत सावकाश येऊन भोजदेवांच्या कुटीरांत पोंचले. ते आलेले पाहातांच भोजदेव घाईघाईनें उठून त्यांस म्हणाले,

"यावें यावें! आपणांस वार्ता उशीरां कळली वाटतें?"

"नाहीं. कळली पहाटेच. पण हा खोकला ऐकेल तेव्हां ना?"

हरिप्रिय भिंतीशीं असलेल्या असनावर बसले. जयदेवानें त्यांस नमस्कार केला. त्यास जवळ घेऊन हरिप्रिय म्हणाले, "शतायुर्भव बेटा! छान छान! प्रकृति चांगली सुधारली बरें का भोजदेव!"

"आपली कृपा आहे!" भोजदेवांनीं उत्तर दिलें.

हरिप्रिय बहुश्रुत पंडित होते. वृद्धापकाळीं आपल्या एकुलत्या मुलीजवळ येऊन ते मृत्यूची वाट पहात शांतपणें काल कंठीत होते. तारुण्यांत त्यांनीं अनेक सभा गाजविल्या होत्या.

हरिप्रिय जयदेवास म्हणाले,

" बाळ, वेदान्त म्हटलास ? "

" होय. " नम्रपणें जयदेवानें उत्तर दिलें.

" आत्मा कोणास लभ्य आहे ? "

" ज्याला आत्मा शोधतो त्याला. "

" वा: ! योग्य उत्तर ! व्याकरण झालें का ? "

" हो ! "

" रंगांचें उच्चारण कसें करावें ? "

" सौराष्ट्रदेशीय युवती " तक्रं " म्हणतांना जसा अनुनासिक उच्चार करते, तसें. "

" भोजदेव, तुमचा पुत्र नांव काढील ! याला तुम्ही राजपट्टणास घेऊन चला. तिथें महाराज लक्ष्मणसेन—"

" तोच विचार आहे माझाही. पण हें जुळावें कसें ? माझी तर कांहीं दरबारांत ओळख नाहीं. "

आपली क्षीण दृष्टि अधिकच बारीक करीत हरिप्रिय म्हणाले,

" ओळख निघेल. ओळखीचें कांहीं एवढें मोठें संकट नाहीं. पण मी म्हणतों, ओळखीपेक्षां कांहीं चमत्कार दाखवून मगच मानाचा नमस्कार घ्यावा, तें अधिक योग्य. "

" कसला चमत्कार ? "

" सांगतों बाळ, काव्य रचूं शकशील ? "

" होय. सर्वेश्वराच्या लीलांवर मी काव्य करीन. " नम्र पण दृढ स्वरांत जयदेवानें उत्तर दिलें.

" सर्वेश्वरावर काव्य सावकाश केलें तरी चालेल. प्रथम महाराज लक्ष्मणसेनांची स्तुति ज्यांत केलेली आहे, असें चमत्कृतिपूर्ण काव्य रचायचें. आलें लक्षांत ? अगदीं नाविन्यपूर्ण असलें पाहिजे ! पदांपदांत कवीचें लाघव दिसलें पाहिजे. ऐकतांक्षणीं महाराज लक्ष्मणसेन संतुष्टच झाले पाहिजेत. "

जयदेव मौन उभा पाहिला. तो बोलत नाहीं, असें पाहून हरिप्रिय म्हणाले,

" कां रे ? बोलत कां नाहींस ? "

" सांग कीं रे पोरा ! हें तर कांही तुला अशक्य नाहीं ना ? " भोजदेव

जयदेवाच्या मुखाकडे आतुरतेनें पहात म्हणाले.

जयदेवानें आपल्या मनाशीं कांहीएक निश्चय केला. त्याची मूळची तेजस्वी मुद्रा निर्धाराच्या तेजानें अधिकच तेजोमय दिसूं लागली. तो शान्तपणें. स्वरांत यत्किंचित्‌ही फरक न करतां म्हणाला,

" मी माझी वाणी सर्वेश्वराच्या चरणीं वाहिली आहे ! माझे गुरुदेव मला म्हणाले, ' तुझ्या वाणींत मृताच्या अंगीं चैतन्य निर्माण करायचें सामर्थ्य आहे ! त्या वाणीचा उपयोग भलतीकडे करूं नकोस !' ती त्यांची आज्ञा मीं न मोडण्याचा निर्धार केला आहे. यदृच्छेनें जें काय मिळेल, त्यांत सन्तुष्ट राहून जीवन व्यतीत करायचें ! पुरीस जगन्नाथाच्या चरणांजवळ राहून जगन्नाथाची सेवा करायची ! या माझ्या निश्चयांत परिवर्तन होणार नाहीं ! "

हरिप्रिय आणि भोजदेव आश्चर्यमुग्ध होऊन त्याच्या मुखाकडे पहात राहिले.

★ ★ ★

## सहा

बिंदुबिल्व सोडून पुरीस रहावयास जाण्याचा मुलाचा कृतसंकल्प ऐकून भोजदेवांनीं ईश्वरेच्छा बलीयसी, असें म्हणून पुत्रसंकल्पास संमति दिली.

पण आपला पुत्र एवढा विद्वान् होऊनही धनार्जनाकरितां किंचित्‌ही यत्न न करतां जगन्नाथाची सेवा करीत राहणार, हें कानीं पडल्यावर खरें दुःख झालें राधादेवीला. तिनें आपल्या पुत्राकरितां खूपच सोसलें होतें. पण त्याच्यामागें पुढें आपणास सुखाचे दिवस येतील, ही आंतरिक इच्छा होतीच.

विशेषतः जेव्हां बिंदुबिल्व सोडून, नेहमींकरितां सोडून पुरीला रहायला जायचें ठरलें, त्यावेळीं तर वृद्धेच्या मनाला फारच यातना झाल्या.

बिंदुबिल्वाचा मोह निर्माण होण्याजोगें तिथें कांहीं फारसें नव्हतें. गांवांतील पुरोहितवृत्ति हेंच उपजीविकेचें साधन. बिंदुबिल्व गांव तरी असें किती मोठें होते? तेवढी उपार्जनाची व्यवस्था कुठेंही झाली असती.

उरलें चंद्रामौली कुटीर. तें मात्र खूपच हवेशीर होतें.

त्याच्या छताला इतकीं भोकें पडलीं होतीं, कीं त्यांतून दिवसां आणि रात्रीं सारखा वारा आंत घुसत असे. बिंदुबिल्वास वारंवार भेट देणाऱ्या रामदूतांच्या धाडीनें आपली तेवढी खूण मागें शिल्लक टेवली होती.

म्हणून त्या कुटीराचेंही कांहीं फार मोठें आकर्षण नव्हतें.

पण त्या कुटीरासमोर राधादेवीनें पंधरा वर्षांपूर्वीं लावलेलीं सुवर्णचंपक आणि मधुमालती, हीं दोन झाडें सोडून जायची कल्पना मात्र तिला अत्यंत दुःसह होत होती. शेजारणींचा स्नेह ही गोष्टही कांहीं इतकी दुर्लक्ष करण्याजोगी नव्हती.

त्या शेजारणी आणि राधादेवी, या एकमेकींस उपयोगी पडल्या होत्या. आणि प्रसंग पडल्यावर एकमेकींशी भांडल्याही होत्या. अर्थात् ती भांडणें आतां भूतकालांत सम्मीलित होऊन एक नवीनच मधुर रूप घेऊन अंतः-चक्षूंसमोर प्रगट झालीं. भांडत असतां एकमेकींनीं दाखविलेली चिकाटी, शौर्य हे गुण बरोबर असलेल्या चहाडखोरपणा, आगलावेपणा इत्यादि दोषांस मागें टाकून गौरवानें समोर उभे ठाकले होते.

या एवढ्या स्मृति मागें ठेवून बिंदुबिल्व कायमचें सोडून जायचें, म्हणजे मोठा बांका प्रसंग होता.

त्यामुळें अगदीं गाडींत सगळे सामान भरीपर्यंत राधादेवीच्या डोळ्याचें पाणी कांहीं खळलें नाहीं. आदल्या दिवशीं रात्रीं जयदेव मित्रांस भेटून येण्याकरितां बाहेर पडला, तेव्हां राधादेवी भोजदेवांस म्हणाली,

" काय हो ? "

" काय म्हणत्येस ? "

" अजून हें जाणें थांबवितां येणार नाहीं का ? "

" तुझ्या पोराचा स्वभाव तुला माहीत आहे ना ? "

" हो ! " एक आवंढा गिळून राधादेवी म्हणाली, " मीं एवढा आग्रह केला ! रडल्यें रोवल्यें ! पण ज्याअर्थी तो ऐकता दिसत नाहीं, त्याअर्थी पुरीस जावें लागणारच ! तो कांहीं उलट उत्तरें देता, तर वेगळी गोष्ट. पण त्याच्या तोंडून अवाक्षर मला लागेल असें बाहेर पडत नाहीं ! रात्रंदिवस माझी किती ऊठबस करतो ! दुसऱ्या कोणत्याच बाबतींत मला एवढेंही दुखवीत नाहीं. पण याच एका बाबतींत तो जो आपला हट्ट धरून बसला आहे, तो कांहीं ऐकत नाहीं ! "

" मग तुझें तरी काय बिघडलें ? दैवमन्यत्र चिंतयेत्, असें समजावें, आणि स्वस्थ रहावें ! "

" पण असें केलें तर ? "

" काय ? "

" आपण दोघें न गेलों पुरीस तर ? "

" तुला तुझ्या मुलाला सोडून राहतां येईल ? "

हा वार अगदीं मर्मीं लागला. एक उसासा सोडून राधादेवी म्हणाली,

" खरें आहे तुमचें. त्याला सोडून माझें राहणें होणार नाहीं ! आपण मधून मधून परत आलों, आणि महिना महिना राहून गेलों तर ? "

" एवढें मोठें इथें काय आकर्षण आहे ? "

हा प्रश्नही योग्यच होता. पुत्रापेक्षा अधिक मोठें असें दुसरें कांहींही आकर्षण राधादेवीसमोर नव्हतें. थोडा वेळ थांबून ती म्हणाली,

" तसें कांहीं मोठेंसें नाहीं. "

" तर मग एकदां गांव सोडलें कीं परत तिथें यायचें नाहीं. जया जर राजसभेंत पंडित झाला असता, तर सगळ्या गांवकऱ्यांनीं आपल्याला डोक्या-वर घेतलें असतें. सगळ्या चालत्या घोड्याच्या गोमाशा ! पण आतां तो जगन्नाथपुरींत जाऊन यदृच्छासंतुष्ट अवस्थेंत दिवस काढायचे म्हणतो ! तेव्हां आतां कोण विचारणार आपल्याला ? असू दे ! जें काय दैवांत लिहिलें असेल, तें भोगावें. आपला पुत्र उन्मार्गगामी नाहीं, यांतच संतोष मानावा, आणि दिवस काढावेत. जगायचें तरी असें किती राहिलें आतां ? "

मग राधादेवीही कांहीं बोलली नाहीं.

दुसरे दिवशीं सकाळीं जेव्हां धोळू कोळी आपली गाडी घेऊन सामान भरण्यासाठीं आला, तेव्हां गांवकरी मंडळी येऊन एकत्र झाली. भोजदेव गांव सोडून जाणार म्हणून सगळेच हळहळूं लागले.

" बाकी कांहीं म्हणा तुम्ही ! भोजदेवांसारखा पुरोहित दुसऱ्या कुठेंच मिळायचा नाहीं ! " रुद्रदामनानें मत प्रगट केलें.

" नव्हे तर काय ! अगदीं दिली तेवढ्या दक्षिणेवर संतुष्ट होणारा भोजदेवांसारखा ब्राह्मण या सबंध भारतांतहि भेटणें विरळा ! मग वंग कलिंगांची गोष्ट कशाला ? " अभिरामानें वणिक्वृत्तीला शोभेसा अभिप्राय दिला.

" एवढे दिवस झाले, सगळ्या गांवकऱ्यांनीं मदिरा पिणारा म्हणून माझी हेटाळणी केली. पण भोजदेवांच्या मुखांतून कांहीं माझ्या विरुद्ध शब्द निघाला नाहीं ! " यशोवर्मा बोलला.

चंडसेनाला हें सहन झालें नाहीं. तो बोलला, " तर तर ! मदिरा पिणारा, म्हणून गांवकऱ्यांनीं तुझी काय पूजा करावी कीं काय ? "

" चूप रहा ! चण्डसेना, मंत्र न म्हणतां मदिरा पिणारा तूं ! तूं काय नाकानें कंदर्प सोलावास ? " उत्तर मिळालें.

" हा साधू पहा ! म्हणे मंत्र म्हणून मदिरा पितों ! ढोंग सगळें ! मदिरा प्यायची; तर माझ्यासारखी उघड उघड प्यावी ! मंत्रांआड दडून कशाला ? तेवढें धैर्यच नाहीं, आणि म्हणे मंत्र म्हणतों ! कसले मंत्र म्हणतोस रे तूं ? "

भडकून यशोवर्मा म्हणाला, " तोंड सांभाळ चण्डसेना ! माझ्या विद्वत्तेची चेष्टा करतोस ? मला जे वेदमंत्र माहीत आहेत, ते या जयदेवांनाही ठाऊक नाहींत ! आहेत काय हो जयदेव ? "

" ऊंहूं ! " हंसू दाबीत गाडींत भांडीं भरीत असलेल्या जयदेवानें उत्तर दिलें. ऊर्णवस्त्रांची वळकटी बांधीत धोंडू कोळी मध्येंच बोलला,

" या यशोवर्मा आणि चंडसेनांच्या बुद्धिमत्तेची काय स्तुति करावी ? भोजदेव गांवीं जायला निघाले ! आतां परत येणार नाहीं म्हणतात. त्यांना निरोप देणें दूर राहिलें. आणि हे दोघे जणूं काय आतांच मदिरा प्याल्याप्रमाणें भांडत आहेत ! "

" अगदीं बरोबर आहे. भोजदेवा ! तुम्ही हें लहानसें गांव सोडून चाललां, हें कांहीं फारसें चांगलें झालें नाहीं. इथें काय कमी होतें तुम्हाला ? पोटापुरतें भात मिळत होतें ! पौरोहित्यांत इतर वस्तूंचा लाभही कांहीं अगदींच दुर्लक्ष करण्याजोगा नव्हता. तेव्हां ही मिळती भाकरी सोडून तुम्ही न मिळालेल्या पोळीमागें लागलांत, हें कांहीं बरें केलें नाहींत ! " हातीं बैलांचा कासरा धरून उभा असलेला चंद्रवर्मा म्हणाला.

तोंच काठीचा आधार घेऊन हरिप्रिय येऊन उपस्थित झाले.

" म्हाताऱ्यांनीं हातच्या काठीच्या आसऱ्यानें चालावें लागतें ! सोळा वर्षें उलटून गेलीं, म्हणजे " पुत्र मित्रवदाचरेत्, " असें शास्त्रांत सांगितलें नाहीं का ? असूं द्या ! जयदेव जें काय करील तें चांगलेंच करील. " भोजदेवांनीं उत्तर दिलें.

" ठीक आहे ! शुभास्ते पंथानः सन्तु ! सगळें सामान घेणें झालें का ? " हरिप्रिय पिंपळाच्या पारावर टेंकत म्हणाले. इतर मंडळींनींही मग आपलें बोलणें बंद करून पुरीला जाऊन कसकसें वागावे, हा व्यवहार जयदेवास शिकविण्यास प्रारंभ केला.

कुटीरांतला प्रसंग याहून वेगळा होता. भामिनी, इन्दिरा, वसुमति, विद्यावती, नेत्रा, विलासप्रिया, वैशाली इत्यादि लहान मोठ्या बायांनीं आंत रडायचें दळण घातलें होतें. जयदेव एवढें शिकून आला, पण तें सगळें फुकट गेलें, असा त्यांच्या एकंदर म्हणण्याचा इत्यर्थ होता.

" बाई ! कोणी कोणाचें नाहीं ! ज्याचा तोच ! " एकीनें वेदांत सांगितला.

" छे छे ! जयदेव मोठा चांगला मुलगा ! पण फार हट्टी ! " दुसरीनें पुस्ती जोडली.

" करायचीं काय असलीं मुलें ? " तिसरी फणफणली.

" हें कांहींतरीच बोलणें झालें ! जयदेवासारखा मुलगा नवस करूनही मिळायचा नाहीं ! पण त्याचें मत वेगळें, यांचें वेगळें ! " चौथीचें मत.

" अलीकडे मुलें ऐकेनाशीच झालीं ग बाई ! आमच्या नणंदेच्या सासूबाईच्या बहिणीचा सख्खा मामेजांवई ! तर त्यानें आइबापांना—" पांचवीनें इतिहास सांगायला प्रारंभ केला.

" पण हें कांहीं बरें झालें नाहीं. " सहावीनें मध्येंच उत्तरीयाच्या फाटक्या बाजूनें नाक आणि डोळे पुशीत वस्तुस्थिति सांगितली.

प्रत्येकजण कांहीं ना कांहीं बोलली. केवळ एक राधादेवीच काय ती कुणीकडे तरी पहात मुकाट्यानें डोळे पुशीत बसली होती. तोंच जयदेव आंत आला, आणि आईचा हात धरून म्हणाला,

" आई ! चलायचें आतां ! "

" चला ! " पटकन् उभी रहात राधादेवी म्हणाली. तिनें आतां मुळींच रडायचें नाहीं, असें ठरविलें होतें.

गाडी भरून तयार होती. जयदेवानें ततिच समोरील बाजूला भोजदेव आणि राधादेवीकरितां जागा करून तिथें मऊसर बसायला घातलें होतें. भोजदेव आपले देव हातीं घेऊन गाडीजवळ आले, आणि गहिंवरून मंडळीला हात जोडून म्हणाले,

" येतो मंडळी ! कृपालोभ असूं द्या ! देवाच्या मनीं आम्हीं आतां त्याच्या पायांजवळ रहावें असें आहे. हें कुटीर नीट बांधतां आलें, तर बांधून पांथस्थांना थांबण्याकरितां धर्मशाला करा ! हा सुवर्णचंपक, मधुमालती, यांचीं फुलें ग्रामदैवताच्या पूजेकरितां वापरीत जा ! येतों आतां ! "

सगळ्याच मंडळींचे डोळे ओलावले. स्त्रीसमुदायांतून एक अस्पष्ट रुदनध्वनि उमटला. जयदेवानें भोजदेव आणि राधादेवी, यांना धरून गाडींत बसविलें, आणि कांहीं न बोलतां वृद्ध हरिप्रियांस आणि मंडळीस नमस्कार केला. हरिप्रिय डोळे पुशीत म्हणाले, " शतायुर्भव ! तुझ्या मनोकामना पूर्ण होवोत. भगवान् तुझ्यावर प्रसन्न होवो ! "

धोळूला जयदेवानें खूण करतांच गाडी चालू झाली.

भोजदेव म्हणाले, " अरे ! जया, तूं बसतोस ना ? "

" ऊंहूं ! जागा नाहीं व्हायची गाडींत. पायीं चालतों मी. "

" अरे, जागा नसायला काय झालें ? " अंधा राधादेवी हातानें चांचपडत जागा शोधीत म्हणाली, " ही काय लागेल तेवढी जागा आहे इथें ! ये तूं गाडींत ! "

" नको आई ! बस तूं नीट. दमल्यावर मग मी येईन गाडींत. "

मध्यें बैलांस पाणी पाजण्याकरितां जी काय थोडा वेळ थांबली, तीच, एऱ्हवी दिवसभर गाडी चालत होती. राधादेवी आणि भोजदेव मधून मधून परस्परांना कांहीं प्रश्न करीत, आणि मग पुनः मौन होत. जयदेव गाडीमागें दिवसभर चालतच होता. भोजदेवांनीं आणि राधादेवीनें त्याला भरपूर आग्रह करूनही तो गाडींत बसला नाहीं.

तिसरे प्रहरीं सूर्य अस्ताचलाच्या जवळ जात चालला, आणि गाडी जगन्नाथपुरींत शिरली. धोळूनें विचारलें,

" कुठें थांबायचें ? "

जयदेवानें उत्तर दिलें,

" मंदिराकडे घेऊन चल. "

निरनिराळे प्रासाद, अट्टालिका, धर्मशाळा, यांना मागें टाकीत गाडी जगन्नाथाच्या अतिविस्तीर्ण मंदिराजवळ जाऊन उभी राहिली. गाडी पहातांच तीर्थोपाध्याय वह्या घेऊन धांवले. पण गाडींतील एकंदर वैभव पाहून बहुधा सगळे नाकें मुरडीत परतले.

एक दोन खट होते ते मात्र तिथेंच थांबले. त्यांनीं धोळूला विचारलें,

" कुठून आलांत ? "

" बिंदुबिल्वाहून. "

" नांव काय ? "

बराच वेळ जयदेवाची उपाधि आठवण्याची धडपड करीत शेवटीं धोळू म्हणाला,

" साहित्य पंडित जयदेव ! "

तें नांव ऐकून मोठमोठ्यानें हंसत एक उपाध्याय म्हणाला,

" तुझें नांव आहे हें ? "

" ऊंहूं ! " धोळूनें मागून येत असलेल्या जयदेवाकडे बोट दाखविलें, आणि गाडी ओवऱ्यांजवळ नेऊन सोडली.

जयदेवाकडे पाहून मात्र उपाध्यायाचें हंसणें बंद झालें. त्याच्याकडे पुढें होत तो म्हणाला, " साहित्यपण्डित जयदेव ? "

" नुसताच जयदेव. " जयदेवानें हंसत उत्तर दिलें.

त्याच्या तेजस्वी मुखाकडे पहात उपाध्याय म्हणाला, " नुसताच जयदेव हें खोटें. कांहींतरी उपाधि असली पाहिजे मागें. तो गाडीवाला तिच्याशीं धडपडत होता मघां. "

" पण मनुष्य उपाधींतून मुक्त व्हायचा प्रयत्न करीत असतो ना ? " उपाधि शब्दावर कोटि करीत जयदेव म्हणाला.

ती कोटि एवढ्या लवकर त्या ब्रह्मश्रेष्ठाच्या त्रिपुंड्रचर्चित मस्तकांत शिरूं पावली नाहीं. तो म्हणाला, " एकूण गाडीवाल्यानें थापाच मारल्या तर ! बरें, कोणाकडे उतरणार ? पुरोहित कोण आहे ? "

" देवाच्या दारीं उतरणार. अग्निमीळे पुरोहितम् ! "

हाही विनोद न कळून असंतुष्ट झालेला उपाध्याय म्हणाला,

" देवाच्या दारीं उतरून कसें चालेल ? तीर्थ यात्रा करायची, म्हणजे कुठें तरी उपाध्याय-पुरोहिताकडे उतरलें पाहिजे. "

" पण आम्ही जगन्नाथाच्या चरणांजवळ नेहमींकरितांच रहायला आलों आहोंत. "

" नेहमींकरितांच ? " उपाध्यायानें आश्चर्यानें विचारलें.

लगेच दुसरा उपाध्याय जवळ येत म्हणाला, " काय म्हणतात रे ? "

" नेहमीकरितां रहायला आलों म्हणतात ! "

वाऱ्यासारखी ती बातमी उपाध्यायमंडळींत पसरली. जयदेवाचें तेजस्वी मुख पाहून त्या मंडळीला ती वार्ता कांहीं मोठीशी संतोषजनक वाटली नाहीं. अनेक उपाध्याय तिथें एकत्र झाले, आणि हळूं शब्दांत ते बोलूं लागले, " कशाला आला इथें ? "

" आला असेल भीक मागायला ! "

" आमच्या क्षेत्रांत ही लुडबुड ? "

आम्ही एकाही यजमानाला याच्याकडे उतरूं देणार नाहीं ! "

" देवाच्या दारीं रहातों म्हणे ! "

" याला उतरूं देतां उपयोगाचें नाहीं तिथें ! "

" उघडच आहे! देवाऱ्या ओवऱ्यांत तीर्थेच्छु उतरूं शकतात. भीकमाग्ये नाहींत ! "

जयदेवाचे कानीं हा वार्तालाप जाऊन पोंचला. तो पुढें होऊन हात जोडून त्या ब्रह्मवृंदास म्हणाला, " आचार्य ! मी इथें पौरोहित्य करण्यासाठीं आलों नाहीं. जन्मभर तें करणारही नाहीं. केवळ देवाची सेवा करावी अशी इच्छा आहे. "

हें त्याचें आश्वासन ऐकल्यावर मग उठलेली वावटळ किंचित् शांत झाली. पण जयदेवासारखा तेजस्वी ब्राह्मण जर देवाजवळ राहिला, तर यजमानांच्या दानांचा ओघ त्याच्याचकडे वळेल, त्याची वाट काय ? म्हणून एक म्हातारा नाकेला उपाध्याय पुढें होऊन म्हणाला,

" तरी पण तुम्ही देवाच्या ओवऱ्यांत राहूं शकणार नाहीं ! "

" उघडच आहे ! " दुसऱ्यानें दुजोरा दिला.

" मुळींच राहूं शकणार नाहीं. " तिसऱ्यानें तमाखू पत्राचें सेवन करीत अभिप्राय व्यक्तविला.

जयदेव म्हणाला, " आजची रात्र तरी राहूं कीं नाहीं ? "

" ठीक आहे. आजची रात्र रहा. पण उद्यां तुम्ही इथें दिसलां न पाहिजे ! "

" जशी आचार्यांची आज्ञा ! "

उपाध्याय मंडळी पांगली. जयदेवही गाडीकडे वळला. भोजदेव त्याला म्हणाले, " काय म्हणत होते रे उपाध्याय ? "

" इथें कसें वागावें त्यासंबंधीं सूचना देत होते. "

" बरें. रहायचें कुठें ? "

" आजची रात्र इथें ओवरींत. उद्यां आपल्या या झोंपडींत. "

" झोंपडींत ? "

" हो. उद्यांच्या उद्यां कुठें तरी झोंपडी बांधली पाहिजे. धोलू, तूं उद्यांचा दिवस थांबून मला सहाय्य करशील का ? "

" हो ! करीन कीं ! पण पण्डित, इथें का रहातां येणार नाहीं ? "

" त्या लोकांची तशी इच्छा नाहीं ! "

ती रात्र त्या चौघांनीं देवाच्या ओवरींत कांहींतरी खाऊन काढली. दुसरे दिवशीं सकाळीं जयदेव भोजदेवांस म्हणाला, " बाबा, स्वयंपाकाचें थोडें

साहित्य आपल्या जवळ अवशिष्ट आहे. तुम्ही आईला जेवूं घालाल काय ? मी झोपडीचें पहातों."

" हो. मध्यान्ह झाली, म्हणजे तुम्ही दोघेही या—इकडची चिंता करूं नका."

उपाध्यायवर्गांत जरी स्वार्थामुळें जन्म पावलेली मत्सर भावना होती, तरी पुरींत राहणाऱ्या इतर पौरजनांत उदारबुद्धि वास्तव्य करून होती. जयदेवानें विचारतांच एका गृहस्थानें गांवाबाहेरची आपली जागा दिली. तें पाहून दुसऱ्यानें झोंपडी बांधायला लागणारें लांकूड दिलें. तिसऱ्यानें वर अंथरायचें गवत दिलें. चौथ्यानें झोंपडी बांधावयास आवश्यक तें सहाय्य केलें.

लोकांच्या दातृत्वाचा ओघ एकदां सुरू झाला, कीं त्यांत काय वाहून येईल, हें कांहीं सांगतां येत नाहीं. झोंपडी बांधणाऱ्या जयदेवास पाहून एक गृहस्थ म्हणाला, ' आपणास मीं कोणत्या नांवानें संबोधावें ! "

" मला जयदेव म्हणतात. "

" मी आपणास आचार्य जयदेव म्हणेन. आपण विद्वान अहांत हें सांगायला कांहीं ज्योतिषाची आवश्यकता नाहीं. देवानें मला एक पुत्र दिला आहे. त्याला आपण पढवाल काय ? "

" आपण त्याला पढवूं इच्छितां ? "

" त्यानें काव्य पढावें अशी माझी इच्छा आहे. काव्य आपण पढवूं शकाल ना ? " धोलू झोपडीचा वासा बांधीत होता. तो म्हणाला, " अहो, यांना साहित्य पण्डित हीं उपाधि मिळाली आहे. "

" साहित्य पण्डित ? " गोंधळांत पडून तो गृहस्थ म्हणाला.

" साहित्य दिक्पति ! पण नवद्वीपांतील माझ्या आचार्यांनीं शिष्यप्रेमानें तो माझा केलेला गौरव आहे, इतकेंच ! "

अत्यंत आदरानें त्या गृहस्थानें जयदेवास नमस्कार केला आणि म्हणाला, " आपल्या हातीं माझ्या पुत्रास सोंपवून मी धन्य होईन ! "

" मला जें काय माहीत आहे, तें सर्व मी आपल्या पुत्रास शिकवीन. " जयदेवानें उत्तर दिलें.

त्या रात्रीं त्या सुसज्ज झोंपडींत जेव्हां भोजदेव आणि राधादेवी रहायला आलीं, तेव्हां तिथली व्यवस्था अनुभवून त्यांना मोठा संतोष झाला राधादेवी जयदेवाला म्हणाली, " जया ! हें सगळें एका दिवसांत केलेंस ? "

" होय. "

"इकडे ये बाळ ! तुझे हातपाय दाबून देत्यें ! दुसरें कांहीं करतां येत नाहीं मला करंटीला ! तेवढेंच करीन. लेकरू दमलें माझें ! "

दुसऱ्या दिवशीं तो गृहस्थ आपल्याबरोबर आपला मुलगा आणि तीनचार मंडळी घेऊन आला त्या सर्वांचें स्वागत करीत जयदेवानें त्या मुलाची चांचणी घेतली, आणि रघुवंश शिकविण्यास प्रारंभ केला. " जगतः पितरौ वन्दे पार्वती परमेश्वरौ । " या श्लोकार्धाचा अर्थ त्यानें इतका उत्कृष्ट समजावून सांगितला, की उपस्थित मंडळी तर डोलूं लागलीच, पण भोजदेवाच्या डोळ्यांतूनही आनंदाश्रु वाहूं लागले !

त्या रात्रीं ते राधादेवीला म्हणाले, " धर्मदेवांच्या अपूर्व पाण्डित्याची ज्योत माझ्याच पिढींत मंद झाली ! असें वाटलें, कीं काय हा दीप विझेल ? पण जयाचें आजचें पांडित्य ऐकून आतां ती ज्योत अधिकच प्रज्वलित होऊन दशदिशा आलोकित करून टाकीत आहे, ही गोष्ट माझ्यापुढें अगदीं स्पष्ट झाली ! आतां सुखानें मरण येईल मला ! जया राजदरबारीं न कां जाईना ! जर महाराजाना विद्वत्तेचें खरें मूल्य माहीत असेल, तर ते स्वतः जयाच्या चरणांजवळ येऊन त्याच्यापासून ज्ञानलाभ करून घेतील ! "

" खरेंच ? " आनंदित राधादेवीनें पुसलें.

" मी माझा पुत्र म्हणून त्याची अन्यथा स्तुति करीत नाहीं ! "

दुसरेच दिवशीं आणखी चारसहा गृहस्थ आपापलीं मुलें घेऊन आले.

" आचार्य ! माझ्या पुत्रास व्याकरण शिकणें आहे. "

" असूं दे. मी शिकवीन "

" आचार्य, माझ्या पुत्रानें अर्धवट न्याय म्हटला आहे. त्याचा न्याय पुरा व्हावा अशी माझी इच्छा आहे. आपण याला गौतमसूत्रें पढवाल काय ? "

" राहूं दे. मी पढवीन. "

" आचार्य, माझ्या लेंकरानें कांहीं थोडी ऋक्संहिता आपल्या गुरूजवळ म्हटली. पण त्या गुरूच्या तापटपणामुळें माझें लेंकरूं त्रासलें आहे. आपण त्याची संहिता पुरी कराल काय ? "

" येऊं दे उद्यांपासून. मी पुरी करीन. "

कांहीं दिवसांनीं ती झोंपडी पुरेना. म्हणून पुरींतील धनिकांनीं एक मोठी पाठशाला बांधून दिली. ती सबंध पाठशाला विद्यार्थ्यांनीं गजबजून जाऊं लागली. प्रत्येक विद्यार्थी आपल्या त्या तरुण गुरूच्या अध्यापनकौशल्यावर परम संतुष्ट होता.

पण अनेकांनीं आग्रह करूनही जयदेवानें आपली झोंपडी सोडली नाहीं. तो म्हणाला, " मनुष्यानें आवश्यक तेवढें अन्नआच्छादन मिळालें कीं संतुष्ट असावें. या कुटींत मला जें सुख आहे, तें अन्यत्र कुठेंही गेलों, तरी वाढणार नाहीं. मग मी उगीच अधिकाची इच्छा कशाला करूं ? "

दोन वर्षांनीं जयदेवाच्या मातृपितृप्रेमाचा परिपूर्ण आस्वाद घेत भोजदेव आणि राधादेवी या दोघांनीं आठ दिवसांच्या अंतरानें स्वर्गगमन केलें. मुनेच्या मुखावरून हात फिरवायची राधादेवीची इच्छा मात्र अपूर्णच राहिली.

* * *

# सात

पुरीची कार्तिकी यात्रा, म्हणजे मोठेंच प्रकरण. आजही लक्षावधि यात्रेकरू दरवर्षी पुरीस जाऊन जगन्नाथदर्शनानें पावन होऊन परतत असतात. त्या काळीं तर देशभरच्या धार्मिक वृत्तीला बहर आलेला होता.

प्रवासाचीं साधनें अत्यल्प. मार्गही कांहीं निष्कंटक नाहीं. आजूबाजूच्या प्रांतांत निरनिराळ्या राजांची सत्ता असल्यामुळें या राज्यात लुटालूट करून त्या राज्यांत आश्रय घेण्याची प्रवृत्ति बहुधा सर्व दरोडेखोरांत आढळून येत असे. यामुळें लुटालुटीचेही प्रकार घडणें अगदीं शक्य होतें. केवळ लुटालूट होऊन भागलें, तर दैव बलवत्तर म्हणायचें. दरोडेखोरांना मनुष्याच्या प्राणाची कांहीं फारशी मोठी किंमत नसल्यानें प्राणभय सर्वत्र साम्राज्य पसरवून होतें.

पण एवढ्या सर्व संकटांस न जुमानतां लाखों यात्रेकरू प्रतिवर्षी पुरीस येत. जगन्नाथाच्या यात्रेच्या मुख्य दिवसांत एकादशी हा एक महत्त्वाचा दिवस असल्यानें त्या वेळीं पुरीस खूपच गर्दी होत असे.

कार्तिकाचा मास. वर्षाॠतु नुकताच संपून शरदृतूला प्रारंभ झालेला. देवाघरच्या माळ्यानें पृथ्वीच्या उपवनीं पाणी घालण्यांत हयगय न केल्यानें तें उपवन हिरवेंगार असलेलें, कुठें कुठें पिवळी छटाही दिसूं लागलेली.

शेतांतील पहिलें पीक हातीं आलेलें.त्यामुळें समाधान पावलेले कृषीवल भरपूर पीक निर्माण केल्याबद्दल देवाजवळ कृतज्ञता व्यक्त करण्यासाठीं पुरीस येत.

नानाप्रकारच्या वस्तूंचा संग्रह घेऊन अनेक श्रेष्ठी आपापलीं दुकानें यात्रेंत आणीत. तोळाभार परमार्थ साधून त्याबरोबरच जातां जातां शेरभर स्वार्थ साधावा, या उदात्त हेतूनें प्रेरित होऊन ते पुरीस येत असल्यामुळें त्यांच्या सद्हेतुविषयीं शंका बाळगणें धोक्याचें ठरलें असतें.

धनिक येत, क्षत्रिय येत, शूद्र येत आणि साधुसंतांची त्या यात्रेंतील संख्याही कांहीं अजिबात दुर्लक्ष करण्याजोगी नसे.

यात्रेचें आणीक एक वैशिष्टय म्हणजे त्यावेळीं मंदिराच्या सभामंडपांत

भरणारी विद्वत्सभा. त्या सभेंत भाग घेण्याकरित आणि तिच्यांतील वाद-विवादाची मौज पाहण्याकरितां देशोदेशीचे पण्डित तिथें एकत्र होत.

या वर्षीही नियमाप्रमाणें यात्रा येणें सुरू झालें. पुरीचे सर्व भाग व मार्ग अश्व, गाड्या, रथ, पालख्या, इत्यादि वाहनांनी वाहूं लागले. नाना प्रांतींच्या अनेक भाषाविदांच्या संभाषणानें पुरीचे बाजार गजबजून जाऊं लागले.

पुरींत धनदास नांवाचे एक मोठे श्रेष्ठी रहात. त्यांचा पुत्र दिवोदास जयदेवाच्या पाठशाळेंत अध्ययन करीत असे. धनदासांच्या मनीं जयदेवा-विषयीं मोठी श्रद्धा वास्तव्य करून होती. शक्य त्या सर्व मार्गांनीं जयदेवास सहाय्य करून धनदास त्या याविषयींची आपली कृतज्ञता प्रगट करीत असत.

पाटलीपुत्राहून प्रतिवर्षी पण्डित महाप्राण नांवाचे एक वेदान्ती यात्रेस येत, आणि धनदासांचे घरीं उतरत असत. वेदान्तांत महाप्राणांची गति कोठपर्यंत होती हा जरी मतभेदाचा प्रश्न असला, तरी त्यांच्या बाह्योपाधींत कोणतेंही न्यून त्यांनीं राहूं दिलें नव्हतें, याविषयीं त्यांच्या शत्रूंनींही मान्यता दिली असती.

मुंडण केलेलें मस्तक, निरस्तपादप देशांतील एरण्डवृक्षाप्रमाणें त्या मस्तकास भूषविणारी प्रशस्त शिखा, महाप्राण या नांवास शोभा देईल, एवढें प्रचंड शरीर, त्या शरीरास साजतीलसे लहानशा वाटीएवढाले नेत्र, पण्डितमहाशयांनी धारण केलेलीं रेशमी वस्त्रें, हातीं या एकंदर अवयवसमूहास यथायोग्य असा वेळूचा दंड, हें पाहून पण्डितमहाशयांच्या वेदान्तप्रवीणत्वाबद्दल शंका घ्यायचें साहस कोणीही करीत नसे.

पण्डितमहाशय म्हणत, "माझें प्रवचन ऐकूनही ज्यांचें समाधान होत नाहीं, त्याचें समाधान हा माझ्या हातांतील कनौजी सोटा करील!"

यंदा पण्डितमहाशयांचें आगमन झालें. भोजनोत्तर वामकुक्षी आटोपल्यावर ते सप्तपदार्थी अमृतवल्लीची—जिला प्राकृत भाषेंत भांग म्हणतात—सिद्धता करीत असतां धनदास तिथें आले आणि पण्डिमहाशयांस आदरानें प्रणाम करून म्हणाले, "महाराज, सर्व वस्तूंची सिद्धता तर आहे ना?"

"अं? हो काळी मिरीं पाहिजेत."

"मागवितों."

एका सेवकास मिरीं आणण्यास सांगून धनदास म्हणाले,

" महाराज ! यंदांची विद्वत्सभा चांगलीच गाजणार ! "

हातांतील वरवंट्यास विश्रांति देत पण्डित महाप्राण म्हणाले, " कां ? "

" यंदा सभेंत एक पंडित मोठा पराक्रम करतील ! "

दुपारच्या भोजनामुळें महाप्राणांचे ठाईं प्रगटलेला संतोष निम्मा कमी झाला. ते आपल्या खर्ज स्वरांत गुरगुरले, " कोण आहे तो पंडित ? "

" त्यांचें नांव जयदेव. इथें गांवाबाहेर त्यांची पाठशाळा आहे. मोटे शांत. स्वभाव तर जणूं काय मधामारखा आहे ! इथल्या सगळ्या लोकांची त्यांच्यावर अलोट श्रद्धा आहे. "

" तुमचीही ? " महाप्राणांनीं आपले विस्तीर्ण नेत्र अधिकच विस्फारीत प्रश्न केला.

" होय महाराज ! खोटें कशाला सांगूं ? मोठा गोड मनुष्य. माझा पुत्र त्यांच्याच पाठशाळेंत जातो. तो आपल्या गुरुजींच्या शालीनतेवर मोठा प्रसन्न आहे ! "

" शालीन स्वभाव एखाद्या जड पाषाणाचाही असतो ! शालीनता हें पांडित्याचें लक्षण नव्हे. "

" नव्हे नव्हे महाराज. ते मोठे विद्वान् आहेत. "

" कशावरून ? "

" सगळीं शास्त्रें ते शिकवितात. सगळ्यांत त्यांची गति आहे. "

" वेदान्तांतही ? "

" होय महाराज ! "

आतां मात्र महाप्राणांस अगदीं सहवेना झालें. ते गरजले, " माहीत आहे वेदान्त म्हणजे काय तें ? वर्षानुवर्षे घोकून घोकून जीव जातो ! गुरुजींच्या छाट्या धुतां धुतां प्राण अगदीं नकोसे होतात ! त्यांच्याकरितां अमृतवल्ली वाटतां वाटतां हाताला घट्टे पडतात ! तेव्हां कुठें गुरुजींनीं कृपा केली, तर मनुष्य ब्रह्मज्ञानास पात्र होतो ! तेव्हां कुठें मनुष्य स्थितप्रज्ञ बनतो ! हा तुमचा पंडित काय वयाचा आहे ? "

" वय तर महाराज अगदीं थोडें आहे ! असेल वीसबावीस वर्षे. " ओशाळून जाऊन धनदास म्हणाले.

" मग ? त्याला म्हणावें, माझ्या छाट्या धुवायला रहा वीस वर्षें. चालल

लेकाचा पाठशाळा काढायला ! आणि तुम्ही लोकही भले कोणाच्याही नादीं लागतां ! वेदान्तांत कोण प्रवीण आहे तें या महाप्राणाला विचारा ! नुसतें तोंड पाहिल्याबरोबर सांगेन कोण प्रवीण आणि कोण अप्रवीण तें. तुम्हां लोकांना काय त्याची परीक्षा ? त्याच्या हातांना घट्टे पडले आहेत ? "

" मीं पाहिलें नाहीं महाराज ! "

" असूं द्या. मधुकरी मागमागून त्याच्या पायांना भेगा पडल्या आहेत ? "

" तेंही मला माहीत नाहीं. "

" जाऊं द्या. माझ्यासारखा तो अनेक तीर्थं हिंडला आहे ? "

" त्याचीही मला कल्पना नाहीं. "

" मग तुम्हांला कसें कळलें तो वेदान्ताचा पंडित आहे म्हणून ? कीं उचलली जीभ आणि लावली टाळ्याला ? "

" पण महाराज, ते वेदान्तसूत्रांवर उत्तम प्रवचन करतात, " भीतभीत धनदास बोलले.

" अरे ! प्रवचनें काय शुक सारिकाही करतात. पढविलें बोलायला, कीं कोणीही टिटपिट टिटपिट करतो. प्रवचनें हें कांही प्राविण्याचें लक्षण नव्हे. "

" महाराज, आपण त्यांची परीक्षा घ्यायला चलाल ? मी तशी व्यवस्था करूं शकेन. "

" परीक्षा ? परीक्षा आतां युद्धक्षेत्रावर. तुम्हीं लोकांनीं तो सभा गाजविणार, असें ठरविलें आहे ना ? तर मग सभेंतच त्याच्या पांडित्याची उंची मापीन मी ! पंडितश्रेष्ठ महाप्राणाशीं गांठ आहे म्हणावें ! "

ही चर्चा जेव्हां दिवोदासानें आपल्या गुरूला ऐकविली, तेव्हां स्मित करीत जयदेव म्हणाला,

" जगन्नाथ जें काय करील तें होईल. "

" पण गुरुजी, ते पंडित अगदीं वाईट आहेत ! "

" कां रे ? "

" त्यांनीं तुम्हांला शिव्या दिल्या. "

" देऊं देत. आपण कोणाला वाईट म्हणूं नये. "

" तरी पण ते वाईट आहेत. ते मला खूप काम सांगतात. केलें नाहीं म्हणजे रागावतात. "

जयदेव केवळ हंसला.

एकादशी दुसरे दिवसावर आली. पुरी चहूं दिशांनीं मनुष्यमय झाली. सगळे प्रासाद, वाडे, घरें, अतिथिशाला माणसांनीं अगदीं भरून गेलीं.

सायंकाळीं विष्णुपुरीहून देवशर्मा, रेणुका, कमला, पद्मा, आणि कांहीं दासदासी, एवढीं माणसें निघून जगन्नाथपुरींतील आपल्या प्रासादांत मुक्कामास आलीं.

खिन्नता तर एक पद्मा सोडून सर्वांच्याच मुखांवर पसरली होती. केवळ पद्माच काय ती पुरीस आल्यामुळें संतुष्ट होती. आतां जगन्नाथाचें दर्शन होईल, अनेक पण्डित पहायला मिळतील, साधुसंतांचें दर्शन होईल, म्हणून तिला मोठा आनंद झाला होता.

आल्याबरोबर देवशर्मा कमला आणि पद्मेस घेऊन देवाच्या मंदिरांत गेले. दर्शन उरकल्यावर ते महंतांच्या भेटीस गेले. महंत निरनिराळ्या उद्योगांत मग्न होते. तरी देवशर्म्यांनीं नमस्कार केल्याबरोबर ते म्हणाले,

" कुशल तर आहे ना ? "

" आपली कृपा आहे महाराज ! "

" देवापाशीं केलेला संकेत ध्यानीं आहे ना ? "

" महाराज ! देवाची वस्तु देवाला देण्याकरितां इथें आणली आहे. "

देवशर्म्यांनीं पद्मेला आणून महंतांच्या पायावर घातलें. कमलेनेंहि महंतांस नमस्कार केला. पद्मेला जवळ घेऊन महंत म्हणाले, " वा वा ! सुंदर वस्तु ! देवाचाच प्रसाद तो ! ही दुसरी कोण ? "

" माझी आई. " पद्मेनें उत्तर दिलें.

" सावत्र आई. " देवशर्म्यांनीं दुरुस्ती केली, " पण हिनेंच तिला लहानपणापासून वाढविलें. ती तिच्या उदरीं येऊं घातलेल्या अपत्याकरितां आपला आशीर्वाद मागायला आली आहे. "

" छान ! ती पुत्रवती होवो ! बरें का मुली, पुत्र होईल तुला. "

" पण महाराज, कमला म्हणाली, याला दुसरा कांहीं उपाय नाहीं का ? "

" ती या तिच्या मुलीविषयीं म्हणत आहे. देवाचें देणें देवाला परत करणें तिच्या जीवावर आलें आहे. " देवशर्म्यांनीं खुलासा केला.

हंसत महंत म्हणाले,

" असें असें ! बाळ, देवावर विश्वास ठेव. त्याच्या संकेताची वाट पहात रहा. तो कृपाळु आहे. जर तुझ्या मनांत ही गोष्ट एवढी लागून राहिली असेल, तर मग तुझ्याच समोर तो सर्व कांहीं उकलून दाखवील. तुला हातीं धरील तो, आणि सांगेल कीं हा मार्ग आहे ! जा आतां. "

देवशर्मा जरी या उत्तरानें संतुष्ट झाले, तरी कमलेचें कांहीं फारसें समाधान झालें नाहीं. पद्मा मात्र या सगळ्या खळबळींत स्थिर होती. देवाच्या कृपेनें आपला जन्म झाला आहे, आणि आज, उद्यां, परवां, केव्हांना केव्हां तरी आपणास हें घर, हीं माणसें, आई, बाई, वडील, या सर्वांना सोडून जावें लागणार आहे, हें तिला कळून चुकलें होतें.

पण तिचें मन ईश्वरानें कसें घडविलें होतें, हें त्याचें तोच जाणे ! हें एवढें कळूनही तिच्या शांत अन्तःकरणावर एकही तरंग उठूं पावला नाहीं. तिच्या मनांत या सर्वांविषयीं मोह कधींच निर्माण झाला नव्हता. यामुळें आपल्याला आपले मातापिता देवाहातीं सोंपविणार, या गोष्टीचें सुखही नव्हतें, आणि दुःखही नव्हतें. ती एक अलौकिक तपस्विनी होती.

रात्रीं कमला पद्मेला आपल्या कुशींत घेऊन झोंपली. सगळीकडे शांतता पसरली. यात्रामग्न पुरीही शांत झाली.

मध्येंच धसका बसून कमला जागी झाली. तिला वाटलें, पद्मेला कोणी-तरी मजजवळून ओढून नेत आहे. म्हणून तिनें तिला अगदीं आपल्याजवळ घेतलें. परत तिच्या डोक्यांत पद्मेविषयींचे विचार धुमाकूळ घालूं लागले. तिला तें दुःख अगदी सहन होईनासें झालें, म्हणून ती हुंदके देऊन रडूं लागली.

शेजारींच रेणुका झोंपली होती. तिलाही कांही मोठी शान्त झोंप लागली होती, असें मुळींच नव्हे. पण एक तर ती अत्यंत संयमी होती. शिवाय आपणच जर रडूं लागलों, तर कमला हाय खाईल, व तिच्या गर्भावर त्याचा अनिष्ट परिणाम होईल, हें माहीत असल्यानें ती आपलें दुःख पिऊन गेली होती.

कमलेचे हुंदके ऐकून ती पटकन् उठून बसली. कमलेजवळ जाऊन तिच्या केशकलापांतून बोटें फिरवीत ती म्हणाली, " कमले, असें रडावें काय बरें ? "

" काय करूं बाई ? हें सहन होत नाहीं ! "

" तुला एकटीलाच ? मलाही सहन होत नाहीं. पण त्याला दुसरा उपाय

नाहीं ना ! मला खूप रडलें पाहिजे. पण मी रडत्यें का ? नाहीं ना रडत ?"

"बाई, तुम्ही अत्यंत स्थिर मन घेऊन जन्मास आलांत ! ही तुमची पोरही तशीच ! पण मला सहन होत नाहीं, मी काय करूं सांगा ना !"

"केलें पाहिजे सहन ! दुसरा कांहीं उपाय नाहीं !"

कमला कांही न बोलतां स्वस्थ पडून राहिली

एकादशी उजाडली. सकाळींच स्नानें उरकून सगळीं मंडळी देवदर्शन करून आली. तिथें मन्दिरांत त्यांना कळलें, कीं आजच्या सभेस मोठा रंग चढणार आहे.

पद्मा देवशर्म्यांस म्हणाली,

"बाबा, आपण जाऊं या ना विद्वत्सभेला !"

"जाऊं बरें ! सगळीच जाऊं. तुला आवडेल ना सभेंतील वादविवाद ?"

"होय."

सूर्यास्त होण्यास थोडा अवधि असतांच विद्वत्सभेचा मंडप श्रोतृसमूहानें भरून गेला. स्त्रिया आणि पुरुष, यांचेकरितां वेगवेगळी व्यवस्था केली होती थोड्या वेळानें देवशर्मा, कमला, पद्मा व रेणुका ही मंडळी येऊन उपस्थित झाली.

देवशर्म्यांचें व्यवस्थापकांनीं स्वागत करून त्यांना मानाच्या जागीं नेऊन बसविलें. स्त्रियाही त्यांच्याकरितां नियुक्त केलेल्या ठिकाणीं जाऊन बसल्या.

एक एक पंडित यावयास प्रारंभ झाला. जाणती मंडळी त्यांची नांवें घेऊन त्यांचेंविषयीं चर्चा करूं लागली.

"हे पद्मपादस्वामी. न्यायांत यांचा हात धरणारा कोणी नाहीं."

"हे राघवेन्द्र. सांख्यशास्त्रांत यांची गति समुद्रांत विहार करणाऱ्या मत्स्याप्रमाणें आहे."

"हे विजयभट्टाचार्य. फार मोठे वैद्य आहेत."

"हे चक्रधरपंण्डित. वेदान्तांत यांचा अधिकार दांडगा आहे."

आपला कन्नोजी सोटा हातीं घेऊन पण्डित महाप्राण सगळ्या प्रेक्षकांचे डोळे आपल्याकडे खिळवीत आले, आणि सगळ्या पण्डितांच्या पुढें जाऊन बसले. त्यांनीं एकदां आपले उग्र नेत्र सगळ्या पण्डितवर्गावरून फिरविले, आणि नंतर ते शेजारच्या पण्डितास म्हणाले,

" अजून आला नाहीं काय ? "

" कोण ? "

" मी त्याचा नामनिर्देश करणें अनुचित समजतों. "

" पण्डित जयदेव ? "

" हूं ! "

" कोण जाणे ! पण प्रतिबृहस्पति आहे म्हणतात ! "

महाप्राणांनीं आपला सोटा जागींच आपटून आपल्या नेत्रांना शक्य तितकें विस्फारीत त्या पण्डिताकडे रोखून पाहिलें. तो पण्डित बिचारा अगदींच गर्भगळित झाला.

" मूर्ख कुठला ! " महाप्राण पुटपुटले.

तोंच आपल्या कांहीं बालशिष्यांस बरोबर घेऊन जयदेवाची शांत आणि तेजस्वी प्रसन्नमूर्ति त्या मंडपांत आली. सगळ्या पण्डितांत गुज स्फुरलें, "जयदेव!"

सगळ्यांचे नेत्र एकदम जयदेवाकडे वळले. जयदेवानें आल्याबरोबर सर्व पण्डितांस प्रणाम केला, आणि तो एका बाजूस जाऊन बसला.

वृद्ध चक्रधर पण्डित उठले आणि म्हणाले, " इकडे ! साहित्य दिग्पति जयदेव, आपलें आसन इकडे आहे. इकडे या असे. "

जयदेव मधुर स्मित करून म्हणाला,

" नको नको ! तें स्थान वृद्धांकरितां राखून ठेवलें आहे. मी तर अगदीं पोर आहे अजून. "

" वा वा ! केवळ केंस पांढरे झाल्यानें वृद्धत्व येत नाहीं. आपण ज्ञानवृद्ध आहांत. नवद्वीपांत आपल्या गुरूच्या मुखावाटें मीं आपली कीर्ति ऐकली आहे. इकडेच आलें पाहिजे आपल्याला. "

निरुपाय होऊन जयदेव उठला, आणि पण्डितसमूहाच्या मध्यभागीं शालीनतेनें जाऊन बसला. त्याचें तें विनयपूर्ण आचरण पाहून सगळ्या पण्डितांस मोठा सन्तोष झाला. आतां महाप्राणांसारखे चारसहा पण्डित मनांत जयदेवाला ढोंगी म्हणाले, ती गोष्ट वेगळी.

सर्व पण्डित जमल्यावर महंत उभे राहून म्हणाले, " विद्वद्वर ! आजच्या सभेंत सगुणोपासना श्रेष्ठ कीं निर्गुणोपासना श्रेष्ठ, या विषयावर वाद व्हावा, अशी पीठाची इच्छा आहे. तरी कोणींही पण्डितश्रेष्ठांनीं उठून

पूर्वपक्ष करावा. मात्र प्रार्थना अशी आहे, कीं वादास वितंडवादाचें स्वरूप न यावें !"

हें म्हणून महंतांनीं हेतुपूर्वक महाप्राणांकडे पाहिलें. सगळे ती खोच उमगले.

आतां पूर्वपक्ष करण्यासाठीं कोण उठतो, याकडे सर्वांचें लक्ष लागलें. शेवटीं एक वृद्ध पण्डित उभे राहिले, आणि त्यांनीं सगुणोपासना अधिक युक्त आहे, असा पक्ष मांडला.

मग मात्र शब्दांची आणि प्रमाणांची घेमार देमार सुरू झाली. पण्डित मंडळींत सहजच दोन पक्ष निर्माण झाले. दोन्ही पक्ष सारख्याच तोलाचे. प्रत्येक जण आपल्या बाजूनें वैदिक प्रमाणें उपलब्ध करूं लागला.

सगुणोपासनावादी म्हणूं लागले, कीं ज्या अर्थीं संहितांत इन्द्र, मरुद्गण इत्यादि देहधारी देवतांच्या येण्याजाण्याचें आणि पराक्रमाचें वर्णन आहे, त्या अर्थीं वेदास सगुणोपासनाच इष्ट आहे.

निर्गुणोपासनावाद्यांचें म्हणणें पडलें, कीं सगळ्या संहितांचा शिरोभाग कीं उपनिषदें, त्यांत निर्गुणोपासनाच वर्णिली असल्यानें निर्गुणोपासनाच श्रेष्ठ.

दोन्ही पक्ष आपापल्या मतावर अडून बसले. नवनवीं प्रमाणें पुढें येऊं लागलीं. निरानिराळे ग्रंथ शोधले जाऊं लागले. तड कांहींच लागेना.

केवळ जयदेव मात्र या वादांत भाग न घेतां स्वस्थ बसला होता. शेवटीं चक्रधर पण्डित उठून म्हणाले,

"पण्डित जयदेव ! आतांपर्यंत वाद चालला, पण आपण कोणताही पक्ष स्वीकारला नाहीं. सगळ्या सभेचें लक्ष तर आपणांकडेच लागलेलें आहे. आपण कां बोलत नाहीं ?"

जयदेव उठून उभा राहिला. तेजस्वी जयदेव. तारुण्याच्या प्रांतांत नुकताच पाऊल टाकीत असलेला जयदेव. सगळे अनिमिष नेत्रांनीं त्याच्याकडे पाहूं लागले.

त्यानें पुनः एकदां सभेस नमस्कार केला. नंतर तो म्हणाला,

"पण्डितश्रेष्ठ चक्रधर ! आपण ज्ञानानें मजपेक्षां वडील आहांत. म्हणून मी आपणांस गुरुस्थानीं मानतों. श्रेष्ठांची आज्ञा झाल्याशिवाय बोलूं नये असा संकेत असल्यानें मी आतांपर्यंत गप्प होतों. सगुणोपासनावाद्यांचें असें म्हणणें आहे, कीं विश्वाचा नियंता परमात्मा समोर असलेल्या मूर्तींत

सांठविलेला आहे. हें खरें ना ? ”

“ अर्थातच ! ” सगुणोपासनावादी पंडित म्हणाले.

“ मला प्रथम एका गोष्टीचा खुलासा करून घेऊं द्या. आपण शास्त्रप्रतीति श्रेष्ठ म्हणतां की आत्मप्रतीति ? ”

“ शास्त्रप्रतीति ! ”

“ भगवान् शंकराचार्यांनीं म्हटलें आहे, शंभर श्रुतिवचनें जरी अग्नि शीतस्पर्शी अथवा अप्रकाशक आहे, असें म्हणूं लागलीं, तरी तीं अप्रमाण आहेत. हे आपणांस मान्य आहे काय ? ”

कोणी कांहीं बोललें नाहीं. जयदेव पुढें म्हणाला, “ मान्य आहे, असें मी धरून चालतों. हिमालय पर्वत या माझ्या मुठींत सांठवलेला आहे, असें जर मी म्हटलें, तर आपण तें खरें मानाल काय ? ”

“ मुळींच नाहीं. ”

“ तर मग पृथ्वी, आप इत्यादि पंचमहाभूतांहून अधिक मोठा असलेला आत्मा या मूर्तींत सांठविलेला आहे, हें आपणांस पटतें काय ? ”

निर्गुणोपासनावादी आनंदानें गदारोळ करून उठले. ‘धन्य’ ‘धन्य’ शब्दानें सभा गर्जली. त्या सर्वांना शांतवीत जयदेव पुढें म्हणाला, “ आनंद मानायचें कांहीं कारण नाही. आता विरुद्ध बाजूनें विचार करायचा. व्यवहाराकरितां आपण अनेक कल्पना गृहीत धरून चालतों. मी असें विचारतों, की निर्गुणोपासनावाद्यांना सगुणोपासना मान्य नाहीं ना ? ”

“ मुळींच नाही ! ” पंडित महाप्राण गर्जले.

“ तर मग ते निर्गुणोपासनावादी दरवर्षी जगन्नाथक्षेत्रीं कां येतात ? या ठिकाणीं सगुणोपासनाच मान्य समजली जाते, हें माहीत असूनही ते आत्तां इथें या मंदिरांत कां जमले आहेत ? जगन्नाथाविषयीं आदरभाव प्रगट करण्यासाठींच नव्हे काय ? ”

“ पंडित जयदेव की जय ! ” हा एकच ध्वनि चहूंकडे घुमूं लागला. सगळ्या पंडितांनी एकमतानें मान्य केलें, कीं एवढ्या थोड्या शब्दांत असा चोख निर्णय आतांपर्यंत कोणीहि दिला नव्हता. स्वतः महंत उठले, आणि त्यांनीं जगन्नाथास वाहिलेली एक पुष्पमाला आणून जयदेवाच्या गळ्यांत घातली. पुनः एकदां जयदेवाचा जयजयकार झाला. पंडित महाप्राणाचें तोंड मात्र

एवढेंसें झालें.

तिकडे स्त्रियांत हा संवाद ऐकत बसलेल्या त्रयोदशवर्षीय पद्मेच्या नेत्रांतून सात्त्विक आनंदाचीं आंसवें वाहूं लागलीं.

* * *

## आठ

भगवान् गोपालकृष्णांनीं आपली मुरली थांबविली.

तरी पण त्या मुरलीनादानें तल्लीन झालेलें विश्व देहभानावर आलें नाहीं.

पांढऱ्या रंगाच्या पुष्ट गाई आणि गोजिरवाणीं वांसरें एकमेकांच्या मानांवर माना टाकून उभीं होतीं, त्या माना कांहीं हालल्या नाहींत.

यमुनेचें काळें काळें पाणी तर जणुं काय पांगुळलेंच.

वायुही वहावयाचा थांबला होता, तो परत सुरू झाला नाहीं.

समाधि लागलेल्या वृक्षांनीं अगदीं हालचाल न करतां जी शांतमुद्रा स्वीकारली होती, तिचाही भंग झाला नाहीं.

यमुनेवर पाणी नेण्याकरितां आलेल्या गोपी देहभान हारपून कलश हातीं धरून अजून तशाच उभ्या होत्या.

त्या अत्यद्‌भुत मुरलीरवानें मोहित झालेली कमला आणि पद्मा, यांचीही तटस्थता मोडली नाहीं.

तों श्रीकृष्ण त्रिभुवन उजळवून टाकणारें हंसूं हसत कदंबवृक्षातळून निघाले.

कदंबवृक्षामागें जयदेव भान हरपून जाऊन बसला होता.

श्रीकृष्णांनीं त्याचा हात धरून त्याला उठविलें, आणि ते कमलेकडे येऊं लागले.

तिच्याजवळ येऊन ते तिला म्हणाले,

" आण ती कन्या इकडे.

" या दोघांचा विवाह होऊं दे.

" मला माझें येणें पावलें. "

श्रीकृष्णांनीं पद्मेला आपल्या हातीं धरलें, आणि तिचा हात त्यांनीं जयदेवाच्या हातीं दिला.

कमलेच्या नेत्रांतून आनंदाचीं आंसवें वाहूं लागलीं.

ती श्रीकृष्णाचे चरण धरूं गेली, तों तिला असें आढळून आलें, कीं तिच्या हातीं तिची उशीच आली !

द्वादशीस पहाटे कमलेची झोंपमोड झाली ती ही अशी.

रात्रीं ती सगळी मंडळी विद्वत्सभेहून परत येतांना जयदेवाविषयींच गोष्टी बोलत होती. पद्मा कांहीं बोलत नव्हती, पण तिचे कान मात्र त्या गोष्टी ऐकण्यापलीकडे दुसरा उद्योग करीत नव्हते. कमला, रेणुका आणि देवशर्मा या तिघांचें एकमत झालें, कीं जयदेवासारखें व्यक्तिमत्व अति दुर्लभ आहे.

त्या विद्वत्सभेचा विचार करीत कमला झोंपली, तों वरील स्वप्न पडून ती जागी झाली.

बराच वेळ तिला नक्की काय झालें, त्याचा बोध होईना.

पण शेवटीं आपल्या शेजारीं झोंपलेल्या रेणुका आणि पद्मा जेव्हां तिच्या दृष्टीस पडल्या, तेव्हां तिला आपण पाहिलेलें स्वप्न होतें, असें वाटलें.

तरी हें कसें स्वप्न ?

हा तर सरळ सरळ देवानें केलेला संकेत होता !

परवांच महंत असें म्हणाले, कीं "तुझ्या मनांतली आर्तता तुला संकेत करील.

मग काय देवाची इच्छा जयदेव आणि पद्मा यांचा विवाह व्हावा, अशी आहे ?

होय ! नक्कीच !

धडपडतच कमला उठली, आणि अत्यानंदानें रेणुकेजवळ जाऊन तिला हांक मारूं लागली.

" बाई ! "

तिची मोठ्यानें मारलेली ती हांक ऐकून रेणुका तर जागी झालीच पण तिच्या शेजारीं झोंपलेली पद्माही जागी झाली.

" काय ग ? "

" अहो ! उठा ! मला दृष्टांत झाला ! "

" काय ? "

कमलेनें आपणांस पडलेलें सगळें स्वप्न सविस्तृतपणें रेणुकेला सांगितलें. तें ऐकून रेणुकेचें शरीर रोमांचित झालें. तिनें अतिकृतज्ञ अंतःकरणानें जगन्नाथाच्या मंदिराकडे वळून हात जोडले, आणि म्हणाली,

" देव दयाळु आहे ! "

त्या दोघींची कल्पना होती, कीं पद्मा झोंपली असेल.

पण ती जागी होऊन हें सर्व ऐकत होती !

आणि आज प्रथमच तिच्या शांत, स्वच्छ मानससरोवरांत अनुरक्तीचा एक अत्यंत लहान तरंग उठला. पटकन् ती आपण जाग्या आहोंत, हें न दाखवीत कुशीवर वळली, तिनें आपलें तें चंद्राप्रमाणें सुंदर असलेलें मुख शालीनें आच्छादून घेतलें !

त्या दोघी तिला उठविण्याच्या भानगडींत न पडतां तशाच घाईघाईनें देवशर्मा झोंपले होते, त्या शय्यागृहांत गेल्या. देवशर्म्यांची झोपमोड होऊन बराच वेळ झाला होता.

त्या दोघींना पाहून ते उठून बसले, आणि म्हणाले,

" कां ग ?"

" प्रकाश दिसला !" कमला म्हणाली.

" कसला प्रकाश ?"

" ईश्वराचा संकेत !"

देवशर्म्यांना कांहीं उलगडा झाला नाहीं. ते गोंधळून कमलेच्या मुखाकडे पहात राहिले.

" अहो ! पहातां काय असे ? स्वतः गोपालकृष्णानें पद्मेचा हात जयदेवांच्या हातीं दिला."

त्यानंतर कमलेनें पुनः एकदा सगळा प्रकार देवशर्म्यांना सांगितला. तें वृत्त ऐकतां ऐकतां देवशर्मा सद्गदित झाले. ते डोळे मिटून म्हणाले, " सर्वेश्वर ! तुला सर्व कांहीं कळतें ! तूं इष्ट तेंच करतोस ! तुझ्या करुणेला पारावार नाहीं !"

त्यांच्या त्या भावसमाधीचा भंग केला रेणुकेनें. ती म्हणाली, " आतां काय ?"

" आतां काय ? देवानेंच दाखविलेल्या मार्गानें जायचें."

" पण हें आपल्याकडून झालें. जयदेव ऐकतील काय ?"

" ऐकलेच पाहिजे त्यांना !"

" ते नाहीं म्हणाले तर ?"

" नाहीं म्हणतील ? तुझ्या मुलीसारख्या सद्गुणी, शान्त, संयमी आणि

सुंदर मुलीला नाहीं म्हणतील ? मग तर त्यांना मनुष्याची पारखच नाहीं, असें म्हणावें लागेल ! ”

“ पण ही चर्चा कां सुरू आहे ? ” कमला म्हणाली, “ जयदेव कांहीं कुठें परगांवीं नाहींत ना ? ” सकाळीं आपण पद्मेला घेऊन त्यांच्याकडे जावें, आणि त्यांना म्हणावें ही वस्तु सांभाळा ! ”

“ होय, असेंच करायचें. ”

सकाळीं जेव्हां पद्मा स्नान उरकून देवघरांत देवाला नमस्कार करून कमलेला नमस्कार करायला आली, तेव्हां कमला अत्यंत प्रेमभरानें तिला म्हणाली,

“ पद्मे, इकडे ये. ”

पद्मा जवळ येतांच तिला आपल्याजवळ ओढून कमलेनें तिचें चुंबन घेतलें. आज पहिल्यानेंच त्या चुम्बनानें पद्मेच्या कमलमुखावर अरुण रंग उठला.

कमला म्हणाली, “पोरी, आज तुला एक गोष्ट सांगणार आहें मी. ”

पद्मा लाजून म्हणाली, “ मीं ऐकलें आहे. ”

“ केव्हां ऐकलेंस ? ”

“ पहांटे तूं बाईला सांगत होतीस तेव्हां. ”

“ लबाड कुठली ! ” लटक्या कोपानें तिच्या गालावर एक चापटी मारीत कमला म्हणाली, “ दुसऱ्यांचीं गुप्त भाषणें ऐकत असतात का अशा कुणी ? तें असूं दे. तुला तुझी जन्मकथा माहीत आहे ? ”

“ होय. ”

“ तर मग हें तुला आवडेल काय ? ”

पद्मेनें केवळ मान खालीं घातली. ती कांहीं बोलली नाहीं. कमला म्हणाली, “ जयदेवांना तूं काल पाहिलेंस. त्यांचा पराक्रमही पाहिलास. त्यांचें तेजस्वी अमोघ वक्तृत्वही ऐकलेंस. ते तुला आवडले का ? ”

याही पाळीला पद्मा कांहीं न बोलतां मौन उभी राहिली. कमलेनें तिला ओढून अगदीं हृदयाशीं धरलें, आणि तिच्या मुखावरून हात फिरवीत ती म्हणाली, “ माझी सोनुली ती ! फार चांगली आहे. जयदेवही सुंदर आहेत. कसा अगदीं इन्द्रशचीसारखा जोडा शोभेल ! पण ते फारसे संपत्तिमान

नाहींत, हें माहीत आहे काय तुला !"

"आत्तांच तूं सांगत्येस, यावरून कळलें."

"मग ? तुला त्या घरीं सुख होईल ना ?"

"आई, सुख हें संपत्तीवर अवलंबून असतें का ?"

"नाहीं ग बाई ! मुळींच नाहीं !"

कमलेनें परत एकदां पद्मेचें चुम्बन घेतलें.

थोड्या वेळानें जेव्हां ती मंडळी जयदेवांच्या पाठशाळेकडे जायला निघाली, तेव्हां कमला पद्मेला म्हणाली, "पोरी, हें महावस्त्र नेस, आणि ती जरीचें काम केलेली कंचुकी घाल. तें एक नवें उत्तरीय काढून ठेवलें आहे, तें अंगावर घे. यानंतर इकडे ये. आज तुला मी माझ्या हातानें अलंकार घालून सजवीन."

पण पद्मा कांहीं पुढें आली नाहीं. तें पाहून कमला म्हणाली,

"ये कीं ग पोरी !"

पद्मा हळूंच म्हणाली, "त्यांच्या प्रपंचांत सुवर्णाचा अभाव आहे. असें तूं म्हणाली होतीस ना ?"

"होय. मग ?"

"मी त्या घरीं नटून थटून प्रवेश करणें बरें दिसेल का ?"

"न दिसायला काय झालें ?"

पद्मा कमलेजच्याजवळ आली, व तिच्या अंगवस्त्राशीं खेळत ती म्हणाली, "आई, आज मी या घरून नेहमींकरितां जाणार आहे ना ?"

हे शब्द ऐकतांच कमलेचें अंतःकरण भरून आलें. ती म्हणाली, "होय !"

"तर मग आज माझें ऐक. मी जशी आहें, तशीं अगदीं साध्या वेषांत त्यांना दिसूं दे. उगीच मूल्यवान् वस्त्रांच्या आवरणाखालीं मला झांकून त्यांच्या-पुढें उभी करूं नकोस !"

कमलेनें पद्मेला घट्ट मिठी मारली, आणि म्हणाली, "पोरी एवढ्याशा वयांत एवढें हें सगळें कुठें शिकलीस बाई ?"

पद्मेनें कांहीं उत्तर दिलें नाहीं. देवशर्म्यांनीं निघतांना विचारलें, "हें काय ? पोर अशीच कां न्यायची तिच्या घरीं ?"

रेणुका म्हणाली, "तें सर्व कमलेकडे सोंपविलें आहे."

कमला रडकुंडीला येऊन म्हणाली, "मी तरी काय करूं आतां ? बाई

तुमची ही पोर ऐकतच नाहीं! कांहींही अंगावर घालायचें अमान्य केलेन् तिनें."

पद्मेकडे पाहून देवशर्मा म्हणाले, "कां ग?"

पद्मेऐवजीं कमलाच बोलली, "ती म्हणाली, आजच्या दिवशीं तरी माझें ऐक! मूल्यवान् वस्त्रें लेववून माझी झांकणूक करूं नकोस."

"ठीक आहे! तिची इच्छा!"

एका सुशोभित शकटांत बसून ती मंडळी निघाली.

जयदेव नित्यक्रमाप्रमाणें स्नानसंध्या उरकून पाकशालेंत जाऊन बलदेव नांवाच्या विद्यार्थ्यास स्वयंपाकासंबंधीं सूचना देत होता. बलदेव हा अध्ययनांत जरी फारसा प्रवीण नव्हता, तरी सूपशास्त्रांतलें त्याचें नैपुण्य वाखाणण्यासारखें होतें.

व्याकरणाच्या सूत्रांची चीरफाड करून त्यांचा अर्थ करण्यापेक्षां घोसाळीं चिरून त्यांची भाजी करणें, हेंच त्याला अधिक सोपें आणि सहज वाटे.

जयदेव पाकशालेंतून पाठशालेकडे निघाला. अजून विद्यार्थी येण्यास अवधि होता. तरी न्यायसूत्रांतील एका सूत्राचा अर्थ जयदेवाला पहायचा होता.

तोंच त्याला समोरून येत असलेला देवशर्म्यांचा शकट दिसला. त्या शकटांत बसलेल्या स्त्रिया पाहून जयदेवास कांहीं बोध होईना. तो विचार करूं लागला,

"आज सकाळींच हे गृहस्थ सहकुटुंब इकडे कां येत आहेत?"

शकट कुटीजवळ येऊन थांबला. देवशर्मा खालीं उतरले, आणि कमलेला म्हणाले, "तूं आणि पोर, दोघी शकटांतच बसून रहा. रेणुकेला मजबरोबर येऊं दे."

नंतर ते जयदेवाकडे वळून म्हणाले, "मी आपणांस काय म्हणून संबोधूं?"

जयदेव प्रसन्नवदनानें म्हणाला, "संबोधनाचा विचार नंतर पाहूं. अगोदर आपण माझ्या कुटींत चलावें. दरिद्री ब्राह्मणाची कुटी आहे, तिथें आपणांस उत्तम आसनें जरी मिळणार नाहींत, तरी कुशासनांना कांहीं कमी नाहीं."

देवशर्मा रेणुकेसह आंत प्रवेश करीत म्हणाले, "ब्राह्मणांना कुशासनांचीच संवय असते."

त्या दोघांना बसायला दोन आसनें देत जयदेव म्हणाला, "तर मग

आपणांस मी नमस्कार करतों. वृद्ध ब्राह्मणांस नमस्कार करावा, असें शास्त्रवचन आहे. "

जयदेवानें देवशर्म्यांस नमस्कार केला. प्रेमभावानें त्याला आलिंगन देत देवशर्मा म्हणाले, " मी आपणांस काय आशीर्वाद देऊं ? "

" आपल्या इच्छेला येईल तो द्या. "

" पहा बरें ? "

" त्यांत पहाण्याजोगें कांहीं नाहीं. वृद्ध ब्राह्मणांच्या मुखांतून अमंगल बाहेर पडायचेंच नाहीं. "

" तर मग ' सुपत्नीवान् भव ' असा आशीर्वाद मी आपणांस देतों. "

जयदेव हंसून म्हणाला,

" या जन्मीं कीं पुढील जन्मीं ? "

" कां ? याच जन्मीं ! नक्कीच या जन्मीं ! "

" शक्य नाहीं तें. "

" कां शक्य नाहीं ? "

" मीं ब्रह्मचर्यांतूनच संन्यास घ्यावयाचें ठरविलें आहे. "

देवशर्मा अस्वस्थ होऊन म्हणाले, " नाहीं नाहीं ! तें ईश्वरी संकेताच्या विरुद्ध होईल ! "

" माझ्या हृदयस्थ ईश्वराची मला तशीच आज्ञा आहे. "

" ऊं हूं ! तुमची निश्चितच कांहींतरी चूक होत्ये आहे ! आपण गृहस्थाश्रमी व्हावें, अशी जगन्नाथाची इच्छा आहे. "

" कशावरून ? "

" त्यानें स्वतः माझ्या पत्नीला तें दृश्य दाखविलें ! "

नंतर देवशर्म्यांनी जयदेवास आपलें सर्व वृत्त सांगितलें. शेवटीं ते रेणुकेला म्हणाले, " बाहेर जाऊन त्या दोघींना घेऊन ये. "

रेणुका गेल्यावर ते म्हणाले, " स्वतः महन्त माझ्या धाकट्या पत्नीला म्हणाले, कीं देव तुला मार्ग दाखवील. तिला आज पहांटेस हा दृष्टांत झाला. जगन्नाथाची इच्छा आपणांस अमान्य करतां येणार नाहीं ! "

" पण मीं तसा निश्चय केला आहे. "

" तो अपणांस बदलावा लागेल. "

तोंच पुढें रेणुका आणि तिच्यामागें पद्मेचा दंड धरून कमला, अशा झोंपडींत आल्या. लज्जेनें पद्मेनें मुख खालीं घातलें होतें, तरी तिची कमनीय आकृति मोटी विलोभनीय दिसत होती.

आंत आल्यावर पद्मा झोंपडीच्या भिंतीला टेकून मान खालीं घालून उभी राहिली. देवशर्मा तिला म्हणाले, " लाजूं नकोस बाळ. ये, तुझ्या भावी पतीला नमस्कार कर. "

मंद पावलें टाकीत पद्मेनें जयदेवास नमस्कार केला, व मातापित्यांस नमस्कार करून पूर्वस्थानीं जाऊन उभी राहिली.

नमस्कार करतांना एकच क्षण त्या दोघांनी परस्परांच्या दृष्टीला दृष्टि भिडविली.

त्या एकच क्षणांत जयदेवानें पाहिलें, कीं कालिदासानें पार्वतीच्या सौंदर्याचें जें वर्णन केलें आहे, त्याचीच प्रतिकृति आपणासमोर उभी आहे ! तसेंच नाक, तसेच नेत्र, तशीच जिवणी, तसाच केशसंभार, तशीच शरीराकृति तसेंच मुद्रेवरील पावित्र्य ! अणुमात्र कमी नाहीं !

सौंदर्योपासक जयदेव स्तिमित झाला. असें मुग्ध सौंदर्य त्यानें कधींच पाहिलें नव्हतें. असें कांतिमान् शरीर तो प्रथमच पहात होता.

पण एकच क्षण त्यानें त्या सौंदर्याच्या प्रतिमेकडे पाहिलें. दुसरे क्षणीं त्याला त्याचा कृतसंकल्प आठवला. तो मनाशीं म्हणाला, " हें रूप फार सुंदर आहे. पण माझा संकल्प ? तोही मला पाळलाच पाहिजे ! "

देवशर्मा जयदेवास म्हणाले, "तर पण्डित जयदेव ही आपली देवदत्ता पत्नी!"

" मी माझा विचार आपणांस मघांच सांगितला. "

" काय ? " कमला म्हणाली.

" याच आश्रमांतून संन्यास घ्यायचा ! " देवशर्म्यांनीं उत्तर दिलें.

" संन्यास घ्यायचा ? " आश्चर्य पावून कमलेनें विचारलें.

" होय मातुःश्री ! " जयदेव म्हणाला, " माझा तसा विचार आहे. "

" पण मला झालेला दृष्टांत ? " कमलेनें विचारलें.

" रात्रंदिवस तेंच चिंतन करीत असल्यामुळें आपणांस तशीं स्वप्नें पडणें कांहीं सर्वथा अशक्य नाहीं. "

क्षणभर कमलेला काय बोलावें तें उमगेना. पण दुसऱ्याच क्षणीं ती

उसळून म्हणाली, " मग काय, मला दिसलेलें दृश्य केवळ स्वप्न होतें ? केवळ भ्रम ? तुमचा हात धरून भगवान् श्रीकृष्ण मजजवळ आले, त्यांनीं तुमच्या हातीं पद्मेचा हात दिला, त्यानंतर ते म्हणाले कीं, माझें मला पावलें, हा सगळा भ्रम ?

" महन्तांनी मला दिलेला आशीर्वादही भ्रम ? यांना मिळालेला ईश्वरप्रसाद हाहि भ्रम ?

" पण्डितमहाशय, आपण इथें बसलां आहांत, हा जर भ्रम असेल, तर मग तोही भ्रम ! आपण या स्थानीं उपस्थित आहांत, हें जेवढें खरें आहे, तेवढाच माझा दृष्टांतहि खरा आहे. आपल्याला माझ्या कन्येचा स्वीकार केलाच पाहिजे ! "

हें सर्व जिच्यासंबंधीं चाललें होतें, तिची अवस्था मोठी अनुकंपनीय झाली होती. तिचें तें कमलाप्रमाणें सुंदर असणारें मुख कोमेजून म्लान झालें होतें. तिला धरणी दुभंग होईल तर बरें, असें वाटत होतें. अत्यंत धैर्यशालिनी असल्यानेंच ती कशीबशी सांवरून उभी राहिली होती.

जयदेवानें पुनः एक क्षणभर तिच्याकडे पाहिलें. तिच्या मुखावर पसरलेली म्लानता जणूं त्याचें अंतःकरण चिरीत आंत जाऊन पोंचली. क्षणभर त्याचा निश्चय डळमळला. पण पुनः एकदां जोर करून तो म्हणाला, " हें मी अमान्य केलें तर ? "

एका क्षणाचाही विलंब न लावतां कमला म्हणाली, " तर ? आम्हीं सगळीं या तुमच्या देवदत्ता वधूला इथें सोडून चाललों. आमचा तुमच्या भद्रपणावर विश्वास आहे. तुम्ही काय उमजेल तें करा ! देवानें दर्शविलेल्या मार्गानेंच आम्हीं जात आहोंत, आमची त्या मार्गावर श्रद्धा आहे ! चला बाई ! "

रेणुकेचा हात धरून कमला उठली, आणि देवशर्म्यांना म्हणाली,

" आपण चलायचें. इथें थांबायचें नाहीं ! ज्याची वस्तु त्याच्याकडे सोंपविली, आतां आपला कांहीं संबंध नाहीं इथें ! "

देवशर्मा गोंधळांत पडून म्हणाले, " पण पोरीला इथें वाऱ्यावर सोडून ? "

" वाऱ्यावर ? देवानें दाखविलेल्या वराच्या स्वाधीन मुलगी करणें, म्हणजे वाऱ्यावर सोडणें ? चला ! " असहाय्य देवशर्मा उठले. त्या दोघां-

नाही कमलेनें झोंपडीच्या बाहेर काढलें, आणि म्हणाली " शकटांत बसा! मीयेत्यें!"

धांवतच ती आंत आली. पद्मा अजून त्याच अवस्थेंत उभी होती. तिचें मुख उचलून कमलेनें तिचें एक चुंबन घेतलें, आणि जयदेवाच्या लक्षांत येण्यापूर्वी तिला त्याच्याजवळ ओढून कमलेनें तिचा हात त्याच्या हातीं दिला. हें कृत्य संपल्यावर ती जशी आली, तशीच दिसेनाशी झाली.

क्षणभर जयदेव आश्चर्यानें दिङ्मूढ झाला. पण त्याला त्याच्या हातीं असलेला तो अति मृदु हात कांहीं सोडवेना. पद्मा एखाद्या पुतळ्याप्रमाणें तशीच उभी होती.

कांहीं क्षणांनंतर जयदेवाच्या मनांत काय आलें कोण जाणे, त्यानें पद्मेच्या हनुवटीस हात घातला, आणि तें नितांत सुंदर मुख वर उचललें.

हाय रे दैवा! पद्मेच्या अत्यंत सुंदर नेत्रकमलांतून अश्रूंचा प्रवाह सुरू होता!

जयदेवाला असा मोह झाला, कीं या अर्धस्फुट कमलपुष्पाचें एक चुंबन घ्यावें. पण त्यानें तो मोह आवरून म्हटलें, " आतां काय करशील तूं?"

" आपण सांगाल तें." उत्तर आलें. अहा! स्वर किती मधुर होता!

" माझा तुझा काय संबंध?"

" मी आपली देवदत्ता वधू आहे. आईला झालेल्या दृष्टांतावर माझा विश्वास आहे."

" पण मीं तुझा स्वीकार न केला तर?" जयदेवानें मन कठोर करून विचारलें.

" तर मी इथें झोंपडीच्या दाराशीं मृत्यु येईपर्यंत निराहार बसून राहीन. मृत्यु आल्यावर आपण मला जाळून टाका."

जयदेवाच्या नेत्रांतून दोन आंसवें गळून खालीं पडलीं. तो म्हणाला, " चल तुझ्या वडिलांकडे. मीं तुझा स्वीकार केला आहे. या स्वीकारास विधींची संमति घेऊं या."

* * *

## नऊ

मार्गशीर्षांत जेव्हां विष्णुपुरीला जयदेव आणि पद्मा या दोघांचा विवाह उरकल्यावर तीं दोघें परत पुरीला आलीं, तेव्हां पाकपटु बलदेव आपल्या गुरुपत्नीस हात जोडून म्हणाला,

" भवसागररूपी सरोवरांत सांपडलेल्या—कुणाप्रमाणें ? कुणाप्रमाणें तें आठवत नाहीं. त्याच्याप्रमाणें मी चिंतित, श्रांत, भ्रमित, क्लांत आणि शांत झालों आहें. "

त्याचें पांडित्य ऐकून हंसूं लागलेली पद्मा म्हणाली, " कां ? "

" मी आपणांस काय म्हणून संबोधन म्हणावें ? "

" माझें नांव पद्मा असें आहे. "

" मी आपणांस पद्मा म्हणणार नाहीं. "

" कां ? "

" कारण आपण माझ्या गुरुपत्नी आहांत. "

" बरें मग ? "

" तोच तर अत्यंत मोठा प्रश्न आहे. आपणांस मातुश्री म्हणावें, तर आपण मजपेक्षां वयानें लघु आहांत. आपल्या वयाची माझी धाकटी बहीण आहे. बरें, मातुश्री न म्हणावें, तर शास्त्रमर्यादेचा शिरच्छेद होतो ! "

" तुम्ही तुमच्या बहिणीस काय म्हणतां ? "

" कधीं इन्दी म्हणतो, कारण तिचें नांव इन्दिरा आहे. कधीं दुष्टा म्हणतों, कारण ती माझ्या अध्ययनांत मर्यादाभंग करत्ये. कधीं—"

" असूं द्या. तर त्यांपैकीं कोणत्याही नांवानें तुम्ही मला हांक मारा. "

" हरे राम ! तें तर मजकडून फारच विस्तीर्ण पातक होईल. मी आपणांस देवी म्हणत जाईन. "

" ठीक आहे. "

" तें राहो. तर माझ्या भाषेविषयीं आपला काय अभिप्राय आहे ? "

" ती फार उच्च कोटीची आहे. " हंसूं दाबीत पद्मा म्हणाली.

" तर मग चांगलें आहे. कारण माझ्या गुरुदेवांचेंहि अभिमत तसेंच आहे. आतां दुसरा प्रश्न. मी आतां काय करीत जाऊं ? "

" आतांपर्यंत काय करीत होतां ? "

" ब्रह्मकर्म आटोपल्यावर व्याकरण शिकत होतों. "

" व्याकरण कुठपर्यंत झालें आहे ? "

गुरुदेवांनीं तीन वर्षांत मला शिक्षा देण्याचा बिकट प्रयत्न केला, पण अजून ते यशस्वी झाले नाहींत. तरी पण मला राम शब्द चालवितां येतो. "

" तर मग पुष्कळच येतें. तुम्ही मला स्वयंपाकास पाणी आणून, सर्पण पुरवून सहाय्य करीत जा. मी तुम्हांला व्याकरण शिकवीन. "

अत्यंत आश्चर्यचकित होऊन बलदेव म्हणाला, " तुम्हांला व्याकरण येतें ? "

" हो, येतें. "

" फलं फले फलानिसुद्धां ? "

" होय. माझ्या माहेरीं एक पण्डित मला शिकविण्याकरितां येत असत. त्यांच्याजवळ मी पाणिनीची अष्टाध्यायी शिकल्यें. "

बलदेवानें आश्चर्यानें पसरलेलें आपलें मुख त्यावर तळहाताचें आच्छादन बसवून झांकून टाकलें. मग तो उठून धांवत धांवत जयदेवाकडे जाऊन म्हणाला, गुरुदेव प्रचंड आश्चर्य ! लघु आश्चर्यसुद्धां नव्हे ! अगदींच प्रचंड आश्चर्य ! "

" काय झालें रे ? "

" अहो ! देवी अष्टाध्यायी शिकल्या आहेत ! "

" खरेंच ? "

" खरेंच म्हणजे काय ? अगदींच सत्य भाषण ! त्यांनींच या गुपिताचा महास्फोट केला ! तोसुद्धां मजजवळ ! "

" असूं दे. "

पाठशाळेंतील अध्यापन आटोपून जेव्हां जयदेव भोजनाकरितां आपल्या पाकशालेंत आला, तेव्हां त्यानें पाहिलें, कीं आज प्रतिदिवसाप्रमाणें पुरुषी अव्यवस्था नाहीं. सगळें जिथल्या तिथें आहे. पाकशाला गोमयानें स्वच्छ सारवून काढलेली असून दारापुढें रेखीव रेघांची रंगवल्लिका चित्रित केलेली आहे. आपणांस बसायला पाट मांडलेला असून एका बाजूस स्वच्छ घासलेलें

जलपात्र भरून ठेवलें आहे. स्वयंपाकाचा सुवासही रोजच्यापेक्षां अगदीं वेगळा आहे.

आणि या सर्व वस्तूंची शोभा वृद्धिंगत करीत एक आदिमाया गिरिजेची प्रतिकृति पाकशालेंत वावरत आहे!

जयदेव अत्यंत प्रसन्न झाला. तो दाराशींच उभा राहून म्हणाला, " आंत यायची अनुज्ञा आहे काय ? "

पद्मा कामांत मग्न असल्यानें तिचें उत्तरीय अस्ताव्यस्त झालें होतें. पटकन् तें सांवरीत ती गोडसें हंसू हंसून म्हणाली, " गृहपति गृहाच्या कोणत्याही भागांत केव्हांही प्रवेश करूं शकतात. "

" गृहस्वामिनीच्या अनुज्ञेवांचून ? "

" होय. "

" तर मग बरें आहे. "

जयदेवानें आंत प्रवेश केला. तो कमरेवर हात देऊन स्वयंपाकाची एकंदर व्यवस्था बघूं लागला. पद्मा त्याला म्हणाली, " तो जलकलश भरून ठेवला आहे. बाहेर जाऊन पादप्रक्षालन करावें आणि येऊन त्या आसनावर बसावें. "

" जशी भगवतीची आज्ञा ! "

जयदेय भोजनास बसला. त्यानें पाहिलें, कीं सर्व भोज्य पदार्थ मोठ्या कुशलतेनें बनविले आहेत. प्रत्येक पदार्थाचा रसिकपणें आस्वाद घेत तो पद्मेच्या मुखाकडे पहात म्हणाला, " तुला हा एवढा चांगला स्वयंपाक कसा करतां येतो ?"

" माझ्या आईनें मला शिकविलेंन्."

" वा ! उत्तम. तुला अष्टाध्यायी कुणी शिकविली ? "

" आमच्या घरीं मला पढविण्याकरितां एक पंडित येत, त्यांनीं. "

" आणखी काय काय शिकविलें त्यांनीं ? "

" रघुवंश शिकविला. "

" बरें. एक विचारूं का तुला ? "

" विचारावें. "

पद्मेच्या कोमल कान्तीकडे निरखून पहात जयदेव म्हणाला, " माझ्या इथें दासदासी नाहींत. भोजनाचीही व्यवस्था मोठीशी चांगली नाहीं. धुणें स्वतः धुवावें लागेल, गृहसंमार्जन करावें लागेल, पाणी आणावें लागेल,

धान्य दळावें लागेल. तुझ्या घरीं हें सर्व करण्यासाठीं हाताशीं दासदासी होत्या. आतां सहाय्यास कोणीही नाहीं. तुझ्याच्यानें हें सगळे कसें होईल ?"

पद्मा त्याला भात वाढीत म्हणाली, "मुली हें सर्व करूं शकतात. त्यांना परिस्थितीशीं समरस फार लवकर होतां येतें. आपण चिंता करूं नये. आपण जें काय आणून द्याल, त्यांत मी सर्व नीटकेपणें करीन."

"ठीक आहे. तुला कष्ट होऊं नयेत, याकरितां मला जें काय करतां येईल, तें मी करीन."

थोडा वेळ जयदेव कांहीं बोलला नाहीं. मग तो एकदम वर पाहून म्हणाला,

"तुला गातां येतें काय ?

"थोडथोडें येतें."

"मीं शिकविलें, तर शिकशील काय ?"

"आपण जें जें शिकवाल, तें तें मी शिकेन."

"सायंकाळीं तुला येत असलेलें गायन मला ऐकवशील काय ?"

"ऐकवीन."

रात्रीं भोजनें उरकलीं. मार्गशीर्ष पौर्णिमेचें अत्यंत स्वच्छ चांदणें चहूंकडे पसरलें होतें. त्याच्या मंद तेजानें दशदिशांत पसरलेली सृष्टि अधिकच सुंदर दिसूं लागली होती. थंडीही चांगलीच चमकूं लागली असल्यानें बलदेव पद्मेस म्हणाला, "देवी ! एक प्रार्थना आहे."

"काय ?"

"कांहीं काष्ठें घेऊन त्यांच्या सहाय्यानें बाहेर अग्निकांड करूं काय ? शीताच्या बाधेनें दंत कटकटायमान होऊं लागले आहेत."

"हो हो ! अवश्य."

बलदेवानें अंगणांत अग्नि प्रज्वलित केला. जयदेवाची शतपावली उरकल्यावर तोही त्या विस्तवाजवळ येऊन शेकत बसला. त्यानें बलदेवास विचारलें, "बलदेवा, ती काय करीत आहे ?"

"पाकशालेंत दिवसभर मांडलेल्या पसाऱ्याचा अपहार करीत असतील."

"तिला बोलवतोस का जरा ?"

बलदेव गेला, आणि पद्मेला म्हणाला, "देवी, गुरुदेव आपली स्मृति रचीत आहेत !"

" आल्यें म्हणून साग. "

थोड्या वेळानें पद्मा घरांतून एक ऊर्णवस्त्र घेऊन आली, आणि तें जयदेवाच्या हातीं देत म्हणाली, " हें वस्त्र पांघरावें. शीत अधिक आहे. "

जयदेव तिच्याकडे कौतुकानें पहात म्हणाला, " दुसऱ्याची चिंता करायची आणि स्वतःविषयीं उदासीन असायचें हें स्त्रियांना कोण शिकवितें, देव जाणे ! "

"यांत शिकवायजोगें कांहीं नाहीं.शीत अधिक आहे,हें तर कोणालाही कळतें."

" पुष्कळांना कळत नाही. हें सगळें इतक्या लहान वयांत तूं कुठून मिळविलेंस ? "

" आपल्या जवळून. ज्या क्षणीं मी या घरीं आलें, त्या क्षणीं मला हें सगळें कळायला लागलें. "

" हें कांहीं खरें नव्हे ! हा आमचा बलदेव पण्डित इथें आज तीन वर्षें रहात आहे. पण व्याकरण शास्त्रांत अजून कांहीं त्याचा प्रवेश होत नाहीं ! "

" पण गुरुदेव ! " जाळांत काटक्या टाकीत असलेला बलदेव म्हणाला, " आपली भाषा ऐकून ऐकून मी भाषाशास्त्रांत तरी प्रवीण झालों कीं नाहीं ? "

" होय रे बाबा होय ! तेवढ्याच करितां तुला एकादी उपाधि दिली पाहिजे. एकदां तुझ्या जिव्हेचें खड्ग चालूं लागलें, कीं शब्दांच्या प्रेतांचा अगदी खच पडतो ! "

जयदेव हंसूं लागला, पद्माही हंसूं लागली. तें हंसूं ऐकून बलदेवास वाटलें, कीं आपल्या भाषाप्रावीण्यावर ही दोघेंही संतुष्ट आहेत. प्रमुदित होऊन त्यानें त्या शेकोटींत मूठभर काटक्या अधिक टाकल्या.

जयदेव पद्मेला म्हणाला, " उभी कां ? बस ना अशी ! "

पद्मा खालीं बसली. जयदेव म्हणाला, " तूं दुपारीं मला गाणें म्हणून दाखवायचें मान्य केलें होतेंस. म्हण आतां. "

" म्हणजे ? देवींना गाणेंही गातां येतें का ? " बलदेव म्हणाला.

" येतें तर ! "

" अहो हो हो ! प्रगट आश्चर्य ! विकट आश्चर्य ! " बलदेवानें मुख पसरून हातानें झांकीत आपलें मत सांगितलें.

" बलदेवा, कोणी गात असलें, कीं आपलें पांडित्य जरा आवरून धरून

मौन होऊन बसावें, असा शिष्टसंकेत आहे."

"टीक आहे. तसेंच करतों."

"हं, करायचा प्रारंभ."

जयदेव आणि बलदेव दोघेही पद्मेकडे श्रवण केंद्रित करून बसले. पद्मेनें त्या नीरव रजनीचा भंग करीत भजन म्हणायला प्रारंभ केला.

**भज भज गोपालम् । गोपीगोकुलपालम् ॥**
**कण्ठ-विलम्बित-नववन माल**
**तनुरुचिरूपतमालम् ॥**
**भज भज गोपालम्॥**

पद्‌मेचा स्वर अत्यंत मधुर होता. गायनाची देणगी तिला अगदीं निसर्गदत्त होती. तिच्या गळ्यांतून निघणाऱ्या आलापांनी भोंवतालचें वातावरण धुंद करून टाकलें. सगळें आसमन्त त्या स्वरलहरींनी गुंजून गेलें. तिच्या मुखांतून जो शब्द बाहेर पडायचा, तो नादाच्या वाहनावर आरूढ होऊन सगळा प्रान्त पादाक्रांत करीत परत येऊन तिच्या भोंवतीं घोंटाळत रहायचा.

जयदेव तो स्वरचमत्कार ऐकून स्तिमित झाला. त्यानें गुरुगृहीं इतर शास्त्रांबरोबर संगीत शास्त्राचेंही अध्ययन केलें होतें. तिथें त्यानें अन्यान्य, धुरंधर संगीतज्ज्ञांचे गायन ऐकलें होतें.

पण एक त्रयोदशवर्षीय मुग्धा भोंवतालचें वातावरण एवढ्या सहजपणें गाऊन असें नादब्रह्ममय करून टाकील, ही कल्पना त्यानें कधींच केली नव्हती.

पद्मा गातच होती.

ती त्या गीताच्या अर्थाशीं समरस होऊन गेली. त्यामुळें आपल्या समोर आपला नवपरिणीत पति बसला आहे, याचेंही भान न राहतां आळआळवून ती गात होती,

**भज भज गोपालम् । गोपीगोकुलपालम् ॥**
**भजभज गोपालम् ॥**
**गोकुलजनमनरंजनलीलम् । चन्दनचर्चितभालम् ॥**
**भज भज गोपालम् ॥**

गातां गातां तिच्या नेत्रांतून अश्रुप्रवाह सुरू झाला. तिचा स्वर दशदिशाना

भेदून टाकीत एकच एक ध्वनि वारंवार प्रतिध्वनित करूं लागला.

**भज भज गोपालम् । गोपीगोकुलपालम् ॥**

जयदेवाची समाधि लागली. बलदेव मूढ होऊन मुख विस्तारून अत्याश्चर्यानें पद्मेकडे पहात राहिला. गीत संपलें, पद्मा थांबली. ती आजच्यासारखें कधींच गायली नव्हती, हें तिचें तिलाही जाणवलें. आजच तिच्या कण्ठांत एवढें माधुर्य, एवढी चमत्कृति कशी निर्माण झाली, याचें तिला अत्यंत आश्चर्य वाटलें.

थोड्या वेळानें जयदेव भानावर आला, आणि म्हणाला, " धन्य धन्य ! पद्मे, तूं धन्य आहेस ! जगन्नाथ मजकडून निश्चितच आपली सेवा करून घेणार ! म्हणूनच त्यानें तुला माझ्या हातीं सोंपविलें. "

" आज अनेक दिवस माझ्या मनांत काव्यपंक्ति घोळताहेत.

" त्या कुठून निर्माण होतात, कोण जाणें !

" मीं त्यांची रचना करायचा प्रयत्न कधींच केला नाहीं.

" तरी त्या जणूं काय अज्ञातांतून प्रगट होऊन माझ्या मनांत कोलाहल माजवितात.

" जणूं काय त्यांना बाहेर येण्याची फार उत्कंठा लागली आहे.

" मी अनेक दिवस त्यांच्याकडे दुर्लक्ष करतों आहे.

" जणूं काय जन्मापूर्वींच त्यांना नष्ट करायची धडपड चालली आहे माझी.

" पण आतां मी त्यांना बाहेर येऊं देईन !

" कारण देवानें माझे हातीं एक अत्यंत अद्भुत अशी वस्तु सोंपविली.

" आतां मी त्याच्या संकेताची पाळणूक करीन.

" पद्मे, मी काव्यें बोलत जाईन, तूं तीं गात जा. गात जाशील ना ? "

" होय ! " पद्मेनें उत्तर दिलें.

जयदेव डोळे मिटून बसला. थोड्या वेळानें तो गाऊं लागला,

**चन्दनचर्चित नील कलेवर पीतवसन वनमाली ।**
**केलिचलन्मणिकुण्डलमण्डित गण्डयुगः स्मितशाली ॥**

कल्याण रागाच्या स्वरांत त्याच्या मुखांतून ही अष्टपदी बाहेर पडली. लगेच पद्मा त्याचें अनुकरण करूं लागली.

पंक्तीमागून पंक्ती जणूं जयदेवाच्या मुखावाटे बाहेर धांवत येत होत्या. पद्मा एकचित्त होऊन आलेली पंक्ति झेलीत होती, आणि नवनवीन स्वरलहरींची माला त्या पंक्तीभोंवतीं गुंफीत होती. किती तरी वेळ तें नवपरिणीत युगुल आपल्या शब्दमाधुर्यानें आणि नादमाधुर्यानें त्या परिसरास नादमय करून टाकीत होतें.

बलदेव आश्चर्याच्या उदधींत बुडी मारून तें संगीत ऐकत बसला होता.

जयदेव थांबला. पद्माही थांबली.

अत्यंत प्रमुदित-चित्त होऊन जयदेव म्हणाला, " पद्मे, आज मला किती आनंद होतोय् म्हणून सांगूं ? "

" मलाही ! " पद्मा म्हणाली.

" तूं आजच्यासारखें कधीं गायली होतीस ? "

" कधींही नाहीं. "

" ही काव्यमाला पुरी करायची. हिचें नांव काय ठेवायचें माहीत आहे ? "

" काय ? "

" गोविंदाचीं गीतें. त्याचा प्रसाद. त्याची प्रेरणा. म्हणून याचें नांव गीतगोविंद. "

दुसरे दिवशीं सकाळीं बलदेवानें रात्रींच्या अद्भुत संगीताचें वृत्त सगळ्या विद्यार्थ्यांस सांगितलें. त्यांच्या द्वारें ती वार्ता त्यांच्या पालकांपर्यंत जाऊन पोंचली.

जयदेवाच्या कुटीसमोर एक अनेक वर्षांचा जुना अशोकवृक्ष होता. रोज सकाळीं प्रातःकर्में उरकून जयदेव आणि पद्मा, दोघेंजण त्या अशोकवृक्षाच्या खालीं बसत, आणि नवनवीन गीतांची रचना करून तीं गीतें गात असत. गांवांतली अनेक गानलुब्ध मंडळी या दोघांची ती गानसमाधि भंग पावूं नये, म्हणून दूरच उभी राहून त्या अद्भुत संगीतरसाचें सेवन करीत असत.

जयदेवाच्या आणि पद्मेच्या या संगीताची वार्ता सबंध पुरींत पसरली.

एके दिवशीं जयदेव जगन्नाथांचे दर्शनास गेला असतां महन्त त्यास म्हणाले,

" पण्डित जयदेव ! "

" काय आज्ञा आहे ? "

" बोलूं कीं न बोलूं, असा संकोच मनांत उद्‌भवतो आहे. "

" मजजवळ महाराजांनीं संकोच मानण्याचें कांहींच कारण नाहीं. "

" आपण आणि आपली पत्नी या दोघांच्या संगीताची स्तुति कानांवर आज अनेक दिवसांपासून येत आहे. तें संगीत जगन्नाथास केव्हां ऐकवाल ? "

" जेव्हां आज्ञा होईल तेव्हां ! "

" येत्या एकादशीला ? "

" जशी प्रभूंची इच्छा. "

त्या एकादशीला रात्रीं मंदिराचा एवढा विस्तीर्ण सभामंडप, पण सगळा माणसांनीं गच्च भरून गेला होता. विष्णुपुरीला संदेश जाऊन तिथून देवशर्मा, रेणुका आणि कमला आलीं होतीं. गांवांतले झाडून सगळे स्त्रीपुरुष तें अत्युद्‌भुत संगीत ऐकण्याच्या लालसेनें एकत्र झाले होते.

देवाची आरती आटोपली. महन्त येऊन आसनस्थ झाले. मृदुंग, वीणा, इत्यादि वाद्यें नीट स्वरांत लाविलीं जाऊं लागलीं. थोड्याच वेळांत जयदेव आला आणि महंतांस प्रणाम करून त्या वाद्यसमुदायांत जाऊन बसला.

महन्त म्हणाले, " पण्डित, देवदत्ता कुठें आहे ? "

" तिच्या मातुश्रीबरोबर येत आहे."

थोड्याच वेळांत कमलेचा हात धरून सौंदर्यवती मृगनयना पद्मा सभामंडपांत आली. कमला आणि रेणुका आपल्या आसनांवर बसल्या, आणि पद्मा पुढें झाली. लोकांनीं तिला करून दिलेल्या वाटेनें ती महन्तांजवळ आली, तिनें त्यांना प्रणाम केला.

" सौभाग्यवती भव ! कुशल आहेस ना ? "

" प्रभूंच्या आशीर्वादानें क्षेम आहे. "

पद्मा जयदेवाच्या मागें जाऊन बसली.

जयदेवानें वीणेच्या स्वरांत आपला स्वर मिसळून दिला. पद्मेनें त्याचें अनुकरण केलें. वीणानादांत त्या दोघांचा स्वर असा एकरूप होऊन गेला, कीं ते तीन नाद अगदीं लक्ष देऊन ऐकणारासही वेगळे जाणवेनात ! लोकांना तर असेंच वाटलें, कीं वीणेचाच नाद शतगुणित होऊन उठला आहे. सगळे आश्चर्यमुग्ध होऊन पुढील चमत्काराची वाट पहात बसले.

जयदेवानें गीतास प्रारंभ केला.

**वन्देऽरविंद नयनाम्बुदाभ । कमनीय मूर्तिधर पद्मनाभ ॥**
**कोदण्डकलाकौतुक निधान । पाखण्डविखण्डन गरुडयान ॥१॥**
**मायाविलास नाना स्वरूप । कुन्दाभदशन जगदेकभूप ॥२॥**
**राजाधिराज वीराधिवीर । रणकर्मकुशल बहुगुणगभीर ॥३॥**

मृदुंगांतून नेमके हेच बोल उमटत होते. झांजेच्या मंजुळ नादानें एकंदर रंगांत अधिकच भर पडत होती. पद्मेचा स्वर जयदेवाच्या स्वराचें कधीं कधीं अनुकरण करी, तर कधीं कधीं जयदेवाच्या षड्जावर स्थिर झालेल्या स्वराभोंवतीं स्वरमालांचें कारंजें उमटून देत असे. कधीं तो सागरास जाऊन मिळणाऱ्या गंगेप्रमाणें मुकाट्यानें जयदेवाच्या चालीनें धावे, तर योग्य वेळ येतांच विद्युद्वेगानें कधीं आकाशांत तर कधीं पाताळांत, अशा गतीनें ऐकणारांच्या श्रवणशक्तीची ओढाताण करी.

लहान मोठीं सर्व माणसें त्या गीतगंगेबरोबर वहात चालली. कुणालाच वेळाचें भान राहिलें नाहीं. दोन प्रहरपर्यंत जयदेव आणि पद्मा हीं दोघेंच अपाल्या अद्‌भुत भक्तिरसांत रंगून जाऊन त्या सर्व समूहाच्या श्रवणशक्तीवर राज्य करीत होतीं.

जयदेव थांबला. पद्माही थांबली.

अन्तःकरण सद्गदित झालेले महन्त म्हणाले, " धन्य जयदेव । धन्य पद्मा ! धन्य गीतगोविंद ! "

महन्तांचें अनुकरण करीत सभा गर्जली,

" धन्य जयदेव ! धन्य पद्मा ! धन्य गीतगोविंद ! "

* * *

## दहा

चार वर्षांचा काल मोठा सुखांत निघून गेला.

पद्मा आतां सतराव्या वर्षांत पदार्पण करीत होती. तिची मूळची सुंदर कान्ति आतां अधिकच सुंदर दिसूं लागली. यौवनाच्या अंगणांत पाऊल घातल्यानें तारुण्याची नव्हाळी तिच्या शरिरांत न सामावतां प्रत्येक अंगप्रत्यंगाच्या वाटें आपला सौरभ बाहेर प्रकटवीत होती.

अतिपरिचयानें निर्माण होणाऱ्या अवज्ञेचें एवढेंसेंही अस्तित्व त्या युवा पति-पत्नींच्या संबंधांत कुठें आढळून येत नव्हतें. उलट परस्परांच्या नवनवीन प्रकट होणाऱ्या गुणांमुळें तें युगुल परस्परांविषयीं अधिकाधिक अनुरक्त होत होतें.

पद्मेचा विवाह झाल्यावर सहा मासांनींच कमलेला पुत्ररत्न झालें. कमलेनें पद्मेला मुद्दाम विष्णुपुरीला बोलावून घेऊन चार मासपर्यंत परत जगन्नाथपुरीला जाऊं दिलें नाहीं.

हा चार मासांचा काल जयदेवास चार सहस्र युगांप्रमाणें भासला. त्या दिवसांत त्याला हा सर्व संसार अगदीं निःसार भासूं लागला, हें विश्व भ्रम आहे, हें तत्त्व पटूं लागलें, पत्नीला चार चार मासपर्यंत माहेरीं ठेवून घेणारी माहेरची मंडळी अगदीं हृदयहीन असतात, असा अनुभवसिद्ध ग्रह निर्माण झाला, आणखीहि बरेंचसें वाटूं लागलें.

तिकडे पद्मेची अवस्थाही कांहीं मोठीशी चांगली नव्हती.

पुष्पवाटिकेंत आपल्या मैत्रिणींबरोबर बसली असतां उगीचच वाऱ्यावर चिडून ती म्हणाली, "हा वायु अगदीं वाईट आहे !"

त्या मैत्रिणींतली एक उषा मोठी चतुर होती. तिनें विचारलें, "कां गे?"

"कांहीं नाहीं. उगीच."

उषा मैत्रिणींकडे पहात डोळे मिचकावून म्हणाली, "समजलें काय ग ? हा वायु वाईट असायचें कारण अगदीं उघड आहे. तो दक्षिणेहून वहात कां येत नाहीं ?"

"दक्षिणेस काय आहे ?" एका मैत्रिणीनें विचारलें.

"दक्षिणेस ? अगे, दक्षिणेस जगन्नाथपुरी आहे, तिथें एक पाठशाला

आहे, त्या पाठशाळेंत एक तरुण तपस्वी एका सुंदरीचें चिंतन करीत बसला—"

उषेचें तोंड दाबीत पद्मा म्हणाली, " उषे, अशानें मी या पुष्करिणींत जाऊन उडी मारीन हां ! "

" पण उडी मारण्यापूर्वीं जयदेवांस विचारलें पाहिजे ना ? "

" तुम्ही सगळ्या अगदीं द्वाड आहांत ! "

तात्पर्य कुठें वायु, मैत्रिणी, मध, पंखा, फुलें यांना नांवें ठेवावींत तर कुठें उसासे टाकीत एकटीनेंच बसावें, कुठें कुणाला न दिसेल, अशा बेतानें डोळ्यांतलीं आंसवें पुसून टाकावींत, अशा रीतीनें पद्मेचे चार मास व्यतीत झाले.

शेवटीं एक दिवस जयदेव लवकरच संन्यास घ्यायचा विचार करीत बसला असतां, अचानक त्याच्या कुटीच्या दारांत शकट येऊन उभा राहिला, आणि त्यांतून पद्मेनें खालीं उडी मारली. त्वरित या जन्मीं संन्यास न घेण्याचें ठरवीत जयदेव पुढें झाला, आणि म्हणाला, " यावें भगवती ! "

सलज्ज पद्मा कांहीं न बोलतां आंत गेली.

त्या दिवशीं रात्रीं झोंपल्यावर पद्मेनें जयदेवास विचारलें,

" आपले हे चार मास कसे गेले ? माझी आठवण येत होती कीं नाहीं ? "

" फार आनंदांत गेले. तुझी मुळींच आठवण येत नव्हती. "

पद्मेनें कूस बदलून आपलें मुख दुसऱ्या बाजूस वळविलें. तिची समजूत घालावयास आणि आंसवें पुसावयास जयदेवास घटकाभर प्रयत्न करावे लागले.

दुसरे दिवसापासून जयदेवास संसार सारसहित वाटूं लागला, विश्व हा भ्रम नाहीं, असा त्याचा निश्चय झाला, सासुरवाडीचे लोक चांगले आहेत, हेंहि पटलें.

पद्मेलाही वायु, मैत्रिणी, मध, पंख, फुलें, हे सर्व पदार्थ चांगले वाटूं लागले.

अशा आनंदांत त्यांचीं तीं चार वर्षें निघून गेलीं. त्या दोघांचें जीवन अगदीं एकरूप होऊन गेलें. चार वर्षांनंतरच्या एका चैत्र मासांतली गोष्ट.

तो दिवस पुरीच्या नागरिकांस मोटा धामधुमीचा गेला. कारण सम्राट् भद्रसेनांच्या मृत्यूनंतर जवळ जवळ सहा वर्षांनीं वंगाधिप सम्राट लक्ष्मणसेनांचें आगमन पुरींत होत होतें. हीं सहा वर्षें राज्यकारभाराची घडी बसविण्यांत व्यतीत झाल्यामुळें महाराज लक्ष्मणसेनास पुरीं जगन्नाथाच्या दर्शनास यायला फावलें नाहीं. आज सगळें राज्ययंत्र नीटपणें रांकेस लावून ते सहकुटुंब

चार मासपर्यंत पुरीस राहाण्याच्या विचारानें पुरीस येत होते.

महाराजांचें वय केवळ बत्तीस वर्षेच होतें. लहानपणीं योग्य गुरुजवळ अध्ययन झाल्यामुळें त्यांचे ठिकाणी साहित्याची मोठी रुचि निर्माण झाली होती, एवढेंच नव्हे, तर महाराजांनीं आपल्या पदरीं त्या कालीं वंग देशांत प्रसिद्ध असलेल्या गोवर्धनाचार्य, धोईकवि, इत्यादि कविश्रेष्ठांनाही आश्रय दिला होता.

या कविजनांच्या संगतिसंगदोषानें स्वतः महाराजांसही काव्य करण्याचा नाद लागला होता. ते बऱ्यापैकी कविता करीत. पदरीं असलेल्या चाटुताकुशल आश्रितांच्या स्तुतिसुमनांनीं वारवार पूजा केली गेली असल्यानें महाराजांच्या मनांत आपल्या कवित्वाविषयीं अहंकार निर्माण होणें अगदीं सहज होतें.

एके दिवशी आरामगृहांत महाराज आपल्या आश्रितांसह बसले असतां एकदम महाराजांस एक चरण स्फुरला.

**वन्दे नन्दकुमारम् ॥**

ते म्हणाले, " ऐका पण्डित वल्लभाचार्य, आम्हांला एक पंक्ति स्फुरली ! "

वल्लभाचार्य मुखावर पुत्रजन्माचा आनंद व्यक्तवीत म्हणाले, " कोणती महाराज ? "

" वन्दे नन्दकुमारम् ! "

" धन्य धन्य ! कालिदास, भवभूति, बाण, या सगळ्यांनीं इथें येऊन महाराजांची पादसेवा करून त्यांच्यापासून काव्याचे पाठ शिकावेत ! वाः ! काय पंक्ति आहे ! काय रस आहे ! काय प्रतिभा आहे ! महाराज एक पृच्छा करूं का ? "

संकोचून जाऊन महाराज म्हणाले, " विचारा ना ! "

" हें दैवी कवित्व आपल्याला कसें स्फुरतें ? काय हो, बटुमंगलाचार्य, काय हो रुद्रवर्मा, हें काव्य दैवी आहे, याविषयीं आपणांस कांही शंका आहे काय ? "

" छे छे ! मुळीच नाहीं ! " दोघांनी घाईघाईनें उत्तर दिले.

महाराज म्हणाले, " पण वल्लभाचार्य, पुढलें जुळलें पाहिजे ना ? "

" हो हो ! महाराजांच्या मुखकमलांतून पहिली पंक्ति स्फुरल्यावर मग पुढील कांहीं कठीण नाहीं ! बोला बटुमंगलाचार्य, पुढील पंक्तीची रचना करून महाराजांच्या सेवेस सादर करा. "

थोडा वेळ डोकें खाजवून बटुमंगलाचार्य म्हणाले, " सिद्ध झाली पंक्ति.

**केलिप्रियनवजगदाधारम् !** "

महाराजांना कांहीं ही पंक्ति रुचली नाहीं. त्यांच्या मुखावरील भाव वाचून पटकन् तोंड कसेंसेंच करीत वल्लभाचार्य बटुमंगलाचार्यांवर खेंकसले, " अहो, ही काय काव्यरचना आहे ? "

" काय झालें ! " घाबरून जाऊन बटुमंगलाचार्य म्हणाले.

" छे: ! हें केवळ शब्दांना एका ठिकाणीं कोंबणें झालें. महाराजांची सरस पंक्ति कुठें, आणि ही अर्थहीन पंक्ति कुठें ? **नवजगदाधारम्** म्हणजे काय ? "

घाईघाईनें बटुमंगलाचार्य म्हणाले, " जाऊं द्या ! दुसरी सांगतों. "

" सांगा. " सम्राटांची आज्ञा झाली.

" **नानाविधशुभगुणभाण्डारम् !** ही कशी काय आहे ? "

" बरी आहे. " महाराजांनीं अभिप्राय व्यक्त केला.

" बरी आहे. " वल्लभाचार्यांनी री ओढली. " पण महाराज, अजून आपल्या पंक्तीच्या तोडीची पंक्ति निर्माण झाली नाहीं, असें आपणांस वाटत नाहीं काय? "

" होय. अजून सरस असल्यास बरी. " महाराज म्हणाले.

परत आपला मस्तकावरील घेरा थोडा वेळ खाजविल्यावर बटुमंगलाचार्य ताडकन् उठून म्हणाले, " महाराज ! तिसरी सांगतों ! "

" काय ? "

" **त्रिभुवनसुंदररूपागारम् !** "

" हां ! ही छान आहे ! " महाराजांनीं मत प्रदर्शित केलें.

" वाहवा ! महाराज, खरोखरच सुंदर पंक्ति ! **वन्देनन्दकुमारम्** । **त्रिभुवन सुंदररूपागारम्** । वा वा ! फारच सुंदर ! " वल्लभाचार्य मान डोलावीत बोलले.

तात्पर्य, महाराजांच्या गीतांची रचना ही अशी होत असे.

महाराज जेव्हां पुरीस येण्याचें ठरलें तेव्हां वल्लभाचार्य म्हणाले, " महाराज, माझी एक प्रार्थना आहे. "

" काय "

" आपलें सगळें काव्य ग्रंथबद्ध करावें, आणि तो ग्रंथ जगन्नाथाचे चरणीं अर्पण करावा."

" छान. अवश्य असें करूं."

" आणीक एक गोष्ट महाराज !"

" आपण तिथें गेल्यावर देवापुढें हीं गीतें म्हटलीं जावींत. तोंपर्यंत दुसरीं कोणीं म्हणूं नयेत."

महाराज म्हणाले, " ही गीतें म्हटलीं जावींत, हें ठीक आहे. पण दुसरीं गीतें म्हणूं नयेत, हें कशाला ?"

" वा वा ! महाराज कस्तुरीचा गंध स्वतः मृगाला अवगत होत नाहीं म्हणतात ! आपल्या या गीतसंग्रहाचें मूल्य किती आहे म्हणून सांगूं ? कधीं कधीं तर मनांत असा विचार येतो, कीं इतर सर्व काव्यें नष्ट करून टाकावींत आणि हेंच एकटें जगापुढें मांडावें ! तें कांहीं नाहीं महाराज ! हा नियम झालाच पाहिजे !"

" ठीक आहे."

महाराज लक्ष्मणसेन बरोबर आपली पत्नी, नातलग, सैनिक असा बराच मोठा लवाजमा घेऊन पुरीस आले. त्यांचा राजप्रासाद त्यांच्याकरितां चांगला व्यवस्थित सजविला गेला होता. महाराज आपल्या प्रासादांत येऊन उतरले.

गांवांतली मंडळी एक एक राजदर्शनास जाऊन आली. महाराजांनीं सर्वांचें कुशल विचारलें, त्यामुळें त्या सर्वांस मोठें समाधान झालें.

त्या दिवशीं सायंकाळीं महाराज व राजमहिषी बरोबर वल्लभाचार्य आणि आश्रितांस घेऊन देवदर्शनास गेलीं. देवदर्शन झाल्यावर सर्व मंडळी महंतांचे दर्शनास आली.

सम्राटांस श्रीफल, पुष्पहार व देवाचा प्रसाद दिल्यावर महन्त म्हणाले, " कुशल तर आहे ना ?"

" होय स्वामी !" महाराजांनीं नम्रपणें उत्तर दिलें.

" किती दिवस इथें वास्तव्य करण्याचा विचार आहे ?"

" तूर्त तरी चार मास इथून हलूं नये, असा संकेत करून आलों आहें. आणि मध्येंच दुर्भाग्यानें जर हा संकल्प मोडावा लागला, तर जगन्नाथाची अवकृपा म्हणायची ! दुसरें काय !"

" राज्यव्यवस्था सकुशल रीतीनें चालली आहे ना ?"

" होय स्वामी. "

" तर मग जगन्नाथावर विश्वास ठेवा. तो सेवेंत अन्तराय निर्माण होऊं देणार नाहीं."

वल्लभाचार्यांनीं मध्येंच तोंड घातलें. ते म्हणाले, " स्वामी, महाराजांची एक इच्छा आहे. "

" काय ? "

" महाराज अलौकिक प्रतिभेचे कवि आहेत ! अलौकिक म्हणजे काय सांगूं ? कालिदास, बाण—"

" वल्लभाचार्य, स्तुति राहूं द्या. " महाराज संकोचून म्हणाले.

" जशी आज्ञा. तर महाराजांचा काव्यसंग्रह जगन्नाथचरणीं समर्पित व्हावा आणि महाराजांचें वास्तव्य इथें आहे, तोंपर्यंत तींच काव्यें देवापुढें म्हटलीं जावींत ! "

" अवश्य अवश्य ! तशी व्यवस्था केली जाईल. महाराज स्वतः काव्य रचतात हें ऐकून मोठें बरें वाटलें. इथें जगन्नाथाचे पुढें महाराजांचीं गीतें अवश्य गाईलीं जातील. "

" स्वामी, महाराजांचीं म्हणजे, महाराजांचींच. "

" मला अर्थ कळला नाहीं. "

चांचरत वल्लभाचार्य म्हणाले, " म्हणजे तोंपर्यंत इतर पद्यें म्हटलीं जाऊं नयेत, अशी महाराजांची इच्छा आहे. "

हंसून महन्त म्हणाले,

" जगन्नाथ तर केवळ शुद्ध भावावर प्रसन्न असतो. तो भाव ज्याचे जवळ असेल, त्याच्या गीतांवर तो सन्तुष्ट असतो. असो. महाराजांची इच्छा पूर्ण करण्याचा प्रयत्न केला जाईल. "

मंडळी उठली.

दुसरे दिवशीं सकाळीं बटुमंगलाचार्य महाराजांकडे एक वार्ता घेऊन आले.

" महाराज, एक मोठी चांगली वार्ता आहे. "

" काय ? "

" या गांवीं जयदेव या नामें कोणी एक पण्डित राहतो, तो भजन मोठें

उत्कृष्ट करतो म्हणे! लोक म्हणतात, तो मोठा उत्तम कवि आहे! आपल्यापेक्षां अधिक श्रेष्ठ नसेलच म्हणा!"

महाराज म्हणाले,

"तो इथें येणार नाहीं काय?"

"वा: ! का येणार नाहीं? आपण स्मरण केल्यावर अवश्य येईल."

"तर मग त्याला जाऊन सांगा, आम्ही त्याची भेट घेऊं इच्छितों. किंवा आज रात्रीं त्याचें भजन ऐकण्याची आम्ही इच्छा करतों, म्हणून सांगा झालें. तुम्ही स्वतः जा. पाहिजे तर वल्लभाचार्यांस बरोबर न्या."

बटुमंगलाचार्य, आणि वल्लभाचार्य दोघेही जयदेवाच्या पाठशाळेकडे निघाले. कांहीं अंतर चालून गेल्यावर वल्लभाचार्य थबकले. ते म्हणाले, "बटुमंगलाचार्य, पण त्या तुमच्या जयदेवाला महाराजांचींच गीतें म्हणायला सांगितलीं पाहिजेत! थांबा. मी पोथी घेऊन येतों."

थोड्याच वेळांत पोथीसहवर्तमान ही कविवरांची दुक्कल जयदेवाच्या पाठशाळेंत जाऊन थडकली. जयदेव आपल्या शिष्यांस पाठ पढवीत बसला होता. या दोघांस पाहतांच तो उठला, आणि म्हणाला, "यावें यावें! इतइतो देवौ!"

जयदेवानें दाखविलेल्या आसनावर बसत ते दोघे त्याच्या प्रसन्न आकृतीकडे पहात राहिले. जयदेव म्हणाला, "काय प्रयोजन घेऊन आगमन केलेंत?"

"आम्ही दोघेही सम्राट लक्ष्मणसेनांच्या बरोबर असतों." वल्लभाचार्य म्हणाले.

"वा वा! मोटी चांगली गोष्ट आहे. तर काय आज्ञा आहे?"

"सम्राटांचें आगमन इथें झालें आहे, ही वार्ता आपणांस कळली असेलच. सम्राटांची इच्छा आपलें नामसंकीर्तन ऐकावें अशी आहे."

"अवश्य. जगन्नाथापुढें मी केव्हांही उपस्थित होईन."

"तर मग आजच रात्री."

"होय."

"दुसरें एक. सम्राटांची अशी इच्छा आहे, कीं आपण त्यांचींच पद्यें म्हणावींत."

"त्यांचींच पद्यें? महाराज पद्यरचना करतात?"

"होय."

त्यानंतर ' कालिदासानेंही महाराजांचेजवळ बसून '–इत्यादि सर्व भगा ऐकवल्यावर वल्लभाचार्य म्हणाले, " हा महाराजांचा पद्यसंग्रह. "

हंसून जयदेव म्हणाला,

" असू द्या. मी तींच पद्यें म्हणण्याचा प्रयत्न करीन. "

कृतकार्य होऊन दोघेजण परतले.

त्या दिवशीं रात्रीं स्वतः सम्राट मंदिरांत नामसंकीर्तनास येणार, ही वार्ता प्रसृत झाल्याबरोबर सबंध मंदिर गच्च भरून गेलें. महाराजांकरितां एक उच्च आसन मांडलें असून सम्राज्ञींकरितांही वेगळी सोय केली होती.

महाराज रात्रीं भोजन करावयास बसले असतां राजमहिषी मांडवीदेवी तिथें आल्या. त्या महाराजांसमोरील आसनावर बसून महाराजांस म्हणाल्या, " आज आपणांस पण्डित जयदेव भजन ऐकविणार आहे म्हणे ! "

" होय. "

" त्यांच्याबरोबर त्यांची पत्नीही भजन करते, असें ऐकतें. "

" असें ? तर मग फार चांगलें आहे. "

सम्राटांकडे रोखून पहात मांडवीदेवी म्हणाल्या, " ती फार सुंदर आहे ? "

" आम्हांला माहीत नाहीं. कदाचित् असेल. "

वेत्रधारकांच्या ललकाऱ्यांत महाराज आणि राजमहिषी सभामंडपांत प्रविष्ट झालीं. सर्वांनीं सम्राटांस उत्थापन दिलें. जयदेव अगोदरच येऊन बसला होता. पद्माही स्त्रियांच्या समूहांत होती.

थोड्याच वेळांत महन्तही येऊन आपल्या आसनावर बसले. वल्लभाचार्य जयदेवास सम्राटांकडे नेऊन म्हणाले, " हे कवि जयदेव ! "

प्रसन्नमुद्रेनें जयदेवाच्या नमस्काराचा स्वीकार करीत महाराज म्हणाले, "आज आपलें संकीर्तन ऐकायचा योग आहे ! "

" जगन्नाथाची इच्छा आहे खरी तशी ! "

मृदुंगादि वाद्यांचा स्वर जुळवून अगोदर सम्राटांबरोबरच्या गायकांनीं दोनतीन गीतें म्हटलीं. त्यानंतर सम्राट जयदेवास म्हणाले, " आतां आपण प्रारंभ कराल काय ? "

जयदेवानें पद्मेकडे पाहतांच पद्मा मोठ्या मर्यादेनें त्याच्या मागें येऊन बसली. तिचें अद्‌भुत सौंदर्य पाहून सम्राट थक्क झाले. ते तिच्याच मुखाकडे

बराच वेळ पहात राहिले. त्यानंतर त्यांना आठवलें, कीं, दुसऱ्याच्या पत्नीकडे असें पाहणें बरें नव्हे.

मांडवीदेवींचें लक्ष सम्राटांच्या नेत्रांकडे होतें. जेव्हां त्यांनीं हा प्रकार पाहिला, तेव्हां त्यांच्या अंतरांत नुसता भडाग्नि पेटला !

जयदेवानें महाराजांची पोथी उघडून तींतलीं गीतें गावयास प्रारंभ केला. तो व पद्मा, दोघांच्या स्वरलहरींनीं आसमंत मोहिनी विद्येनें भारल्याप्रमाणें मोहून टाकलें.

महाराज त्या संगीतचमत्कारानें स्तिमित होऊन गेले. थोड्या वेळानें जयदेव थांबला. महाराज आधाशासारखे म्हणाले, " कृपा करा ! थांबूं नका ! अजून आमचे श्रवण अतृप्त आहेत ! "

जयदेवानें हंसून पद्मेकडे पाहिलें, आणि प्रारंभ केला,

**वन्देऽरविंद नयनाम्बुदाभ । कमनीयमूर्तिधरपद्मनाभ ॥**

पद्मेनें जयदेवाचा चरण उचलून एका क्षणांतच अशी कांहीं अद्भुत स्वररचना केली, कीं ती सर्व श्रोत्यांच्या अन्तःकरणांस व्याप्त करून उठली. सर्वांस असा भास झाला, कीं हें गीत केव्हां सुरू झालें कोण जाणे, केव्हां संपणार आहे, त्याचाही अन्त नाहीं. असीम, मर्यादाशून्य अशा स्वरसागरांत आपण असहाय्यपणें पोहत आहोंत, ही असहायताही सुखकारी आहे, दुःखकारी नाहीं ! हिच्यांत भक्तिरस अनुस्यूत आहे !

तोंच वल्लभाचार्य उठले, आणि म्हणाले, " हा सम्रटांच्या आज्ञेचा भंग आहे ! हें गीत सम्राटांचें नाहीं ! "

उत्तर दिलें, तें महन्तांनीं. ते उठून उभे राहिले, आणि म्हणाले, " वल्लभाचार्य, खरोखरीच हें गीत सम्राटांचें नाहीं. काल मी तुमच्या मुखांतून सम्राटांची इच्छा ऐकली, तेव्हांच उत्तर देणार होतों. पण म्हटलें, वेळ येऊं दे, म्हणजे सांगेन. हें गीत सम्राटांचें नाहीं. पण त्याच्यामागें शुद्धाचरणाची तपश्चर्या आहे. याच्या मागें मधुरा भक्तीचें बळ आहे. याच्या मागें अनन्यशरणता आहे, म्हणून जयदेवाच्या मुखांतून हें गीत बाहेर पडलें. महाराजांचा नियम त्याला माहीत असूनही हें गीत त्याच्या मुखांतून अभावितपणें निघालें.

" महाराजांच्या मनांत शंका रहायला नको. मला माझ्या देशाचा सम्राट

अहंकार-शून्य हवा आहे. वल्लभाचार्य, तुम्ही महाराजांच्या गीतांची पोथी घेऊन गाभाऱ्यांत चला. इथें जयदेवाचा गीतसंग्रहही आहे. दोन्ही संग्रह जगन्नाथासमोर ठेऊं. तो देईल तो निवाडा. करील तो न्याय.

"वल्लभाचार्य, पीठ तुम्हांला आज्ञा करीत आहे ! राजाच्या कल्याणाकरितां ही आज्ञा आहे ! चला !"

सगळी सभा थक्क होऊन काय होतें तें पहात राहिली. वल्लभाचार्य खालीं मान घालून महाराजांचा पद्यसंग्रह घेऊन गाभाऱ्याकडे निघाले. एका सेवकानें त्यांस जयदेवाचा गीतसंग्रह आणून दिला. त्या दोन्ही पोथ्या घेऊन ते गाभाऱ्यांत शिरले. त्यांच्यामागें महंतही गाभाऱ्याच्या द्वाराजवळ जाऊन म्हणाले,

"ठेवा त्या दोन्ही पोथ्या देवासमोर. चला या बाहेर. द्वार लावून घ्या."

वल्लभाचार्यांनीं द्वार लावून घेतलें. सर्व सभा आतां काय चमत्कार होतो तो पाहण्याकरितां श्वास रोखून उभी होती. महंत म्हणाले, "जगन्नाथाला निवाडा करूं दे. त्याला जो ग्रंथ आवडेल, तो वर उचलून धरील. बोला, जय जगन्नाथ !"

सभा गर्जली, "जय जगन्नाथ !"

महंत म्हणाले, "सम्राट, देवानें काय न्याय दिला तें स्वतः आपण पाहून या!"

हुरहुरत्या अन्तःकरणानें सम्राट लक्ष्मणसेन द्वार उघडून आंत शिरले. कांहीं क्षणांनीं ते मान खालीं घालून बाहेर आले, ते थेट जयदेवाजवळ गेले व त्याला आलिंगन देत ते म्हणाले, "कविसम्राट जयदेव ! आपली भक्ति देवाला रुचली ! आपली एकान्तिकता त्याला आवडली. आपली मधुरा भक्ति त्याला गोड वाटली ! आपला ग्रंथ वर असून माझा खालीं आहे !"

पुनः एकदां सभा अत्यानंदित होऊन गर्जली,

"जय जगन्नाथ ! जय जयदेव !"

* * *

# अकरा

राजमहिषी आणि पद्मा, या दोघींचा संवाद चालला होता.

त्या रात्रींपासून सम्राट लक्ष्मणसेन जयदेवाचे अनन्य मित्र बनले. वारंवार ते जयदेवाच्या पाठशाळेंत जाऊन त्याच्याशीं काव्यशास्त्राची चर्चा करीत बसत. अनेक वेळां जयदेवही सम्राटांच्या प्रासादांत येत असे.

पद्मेचें अप्रतिम सौंदर्य, हा जरी मांडवीदेवींच्या नेत्रांत सलणारा कांटा होता, तरी त्यांना महाराजांनीं सांगितलें, म्हणून चारसहा वेळां पाठशाळेंत जाऊन पद्मेशीं वार्तालाप करावा लागला होता. पद्मेलाही त्यांनीं शिष्टाचार म्हणून चारपांच वेळां प्रासादांत बोलविलें होतें.

आज राजमहिषींच्या निमंत्रणावरून पद्मा त्यांच्या महालांत एका असनावर बसून त्यांच्याशीं बोलत होती. तिनें केवळ एक शुभ्र वस्त्र व शुभ्र कंचुकी एवढींच वस्त्रें धारण केलीं असून अंगावर घेतलेलें उत्तरीयही शुभ्रच होतें. तिच्या विपुल, कृष्णवर्ण केशसंभारांत एक नीलकमलाचें छोटेंसें पुष्प खोंचलेलें होतें. हा अगदीं साधा वेष ल्याली असूनही कर्पूरगौरा पद्मा अत्यंत कमनीय दिसत होती.

तिच्या त्या साध्या वेषापुढें राजमहिषींनीं केलेला शृंगार अगदींच निष्प्रभ दिसत होता, हीच गोष्ट राजमहिषींच्या पोटांत डांचत होती.

आपल्या आसनावर रेलून मांडवीदेवी म्हणाल्या, “ पद्मादेवी, एक प्रश्न करूं का तुम्हांला ? ”

“ विचारावें. ”

“ तुमचें माहेर चांगलें श्रीमंत आहे ना ? ”

“ चांगलें श्रीमंत नाहीं, तरी अगदीं निर्धनही नाहीं. ”

“ असू दे. तर तुम्हाला पण्डित जयदेवांच्या दरिद्री संसारांत सुख वाटतें ? ”

राजमहिषींकडे स्थिर दृष्टीनें पहात ती मृगनयना म्हणाली, “सम्राज्ञी, सुख हें अन्तःकरणाच्या समाधानवृत्तीवर अवलंबून आहे, द्रव्याच्या विपुलतेवर मुळींच नव्हे ! ”

तो शब्दबाण तसाच गिळून मांडवीदेवी पुनः म्हणाल्या, " तरी तुम्ही या दरिद्री संसारांत सुखी आहांत काय, हें मला तुमच्या तोंडून ऐकायचें आहे. "

किंचित् सलज्जपणें पद्मा म्हणाली, " चंद्र आणि चंद्रिका, वृक्ष आणि छाया, या वस्तूंप्रमाणें आम्हीं दोघें परस्परांशीं एकरूप होऊन गेलो आहोंत ! एवढ्या उत्तरानें मला वाटतें, आपलें समाधान होईल. त्यांचा आनंद, तो माझा आनंद, त्यांचें समाधान, तें माझें समाधान. त्यांचा सन्तोष तो माझा सन्तोष. जर ते या संसारानें सुखी असतील, तर मग मीहि सुखी आहें. "

हें उत्तर राजमहिषीच्या वर्मी जाऊन लागलें. सम्राटांच्या एकनिष्ठतेविषयीं शंका घेऊन त्या नेहमीं अप्रसन्न असत. एवढें सुख, एवढी संपत्ति दाराशीं हात जोडून उभी असूनही जे सुख त्यांना लाभलें नाही, त्या सुखात ही दोन दरिद्री पतिपत्नी रात्रंदिवस विहार करीत आहेत, ही गोष्ट त्यांच्या हृदयांत बाणाप्रमाणें रुतून बसली.

आपलें विवर्ण मुख उत्तरीयानें झांकून घेत त्या म्हणाल्या, " तें असू द्या. आणीक एक विचारतें. तुमचा सहवास मला हवासा वाटतो. तुम्ही मजबरोबर राजधानीस चलाल ? "

" नाहीं. "

" का नाहीं. ? "

" यांना एकट्याला इथें टाकून माझें येणें व्हायचें नाहीं. "

" माझा आग्रह असला तरी ? "

" ऊं हूं ! "

" तेंही असू द्या. तुम्ही एवढें सुंदर गायन कुठें शिकलांत ? "

" शिकल्यें नाहीं. "

" मग एवढें गोड कसें गातां ? "

" तो यांचा प्रसाद आहे. "

" कोणाहीजवळ शिकलां नाहींत ? "

" ऊं हूं ! "

" केवळ जयदेवांनीं आज्ञा केल्याबरोबर गाऊं लागलांत ? "

" होय सम्राज्ञी. मला हें असें गातां येईलशी मला कल्पनाही नव्हती. विवाहानंतर एक दिवस यांनीं मला गावयास सांगितलें, मी गाऊं लागल्यें.

त्यानंतर हे पुढें गातात, मी मागें. लोकांना तें गोड लागतें एवढेंच. याहून अधिक कांहीं नाहीं ! ”

राजमहिषींची खात्री झाली, कीं आपल्या पतीशीं ही स्त्री इतकी तन्मय होऊन गेली आहे, कीं काय वाटेल तें केलें, तरी यांचें हें ऐक्य भंग पावणार नाहीं. म्हणून मग त्यांनी पद्मेला निरोप देतांना म्हटलें,

“ पद्मादेवी, तुमचें हें सुख पाहून मला हेवा वाटतो ! ”

एके दिवशीं तिसरे प्रहरीं सम्राट् जयदेवाच्या पाठशाळेंत जाऊन पोंचले. जयदेवास आज सम्राट् येणार, याची कांहीं कल्पना नव्हती. यामुळें सम्राटांचे अश्व अचानक पाठशाळेबाहेर उभे राहिलेले पाहून तो थोडा चकितच झाला.

“ त्वरित सम्राटांकरितां आसनाची सिद्धता करण्यास बलदेवाला सांगून जयदेव सम्राटांस सामोरा जात म्हणाला, “ आज अचानक आगमन झालें ? ”

“ होय, मघां वल्लभाच्यार्यांशीं काव्याच्या स्वरूपाविषयीं आमची चर्चा चालली होती. निर्णय लागेना, म्हणून मग आपणाकडे यायचें ठरवून लगेच निघालों. आमच्या आगमनानें आपल्या नित्यकार्यांत तर कांहीं विक्षेप निर्माण झाला नाहीं ना ? ”

“ छे छे ! विक्षेपाचें कांहींच कारण नाहीं. पाठशाळेंत बसायचें, कीं बाहेर अश्वत्थवृक्षाखालीं ? ”

“ बाहेरच बसूं या. ”

बलदेवानें सम्राटांचें आसन बाहेर आणून मांडलें. महाराजांचा अश्व हातीं धरून महाराजांबेराबरचे सैनिक बाहेरच थांबले. महाराज अश्वत्थवृक्षाखालीं मांडलेल्या आसनावर बसत म्हणाले, “ आपण बसावें ना ? ”

बलदेवानें आणलेल्या कुशासनावर बसत जयदेव म्हणाला, “ वल्लभाचार्य नाहीं आले ? ”

“ ते होय ? ” हंसत महाराज म्हणाले, “ तो ब्राह्मण नुसता बोलण्याच्या कामाचा. अश्वारोहणाचें नांव काढलें, कीं त्यांच्या पोटांत भीतीचा गोळा उभा राहतो ! ”

“ वाचिवीर्यं द्विजातीनाम्, या वचनाला हरताळ फांसायचें सामर्थ्य वल्लभाचार्यांत नाहीं, दुसरें काय ? ”

जयदेवानें केलेल्या या विनोदावर दोघेही पोटभरून हंसले. मग सम्राट्

म्हणाले, " तर वाद असा चालला होता, कीं काव्याची व्याख्या काय ? "

" मग वल्लभाचार्यांचें काय म्हणणें पडलें ? "

" तें काय विचारतां ? जें जें आम्ही म्हणत असूं, त्याचें समर्थन करीत असलेले वल्लभाचार्य आपल्या उलट सुलट विधनांचाही विचार करीत नसत ! ते तो विचार कधींच करीत नाहींत म्हणा ! तेव्हां त्यांच्याशीं वाद करून कांहीं उलगडा पडेना. म्हणून मग इकडे आलों. आपण आपली काव्याची व्याख्या सांगा. "

" माझी व्याख्या ? रसात्मकं काव्यं, असें म्हणतात. पण मी केवळ रसात्मक तें काव्य मानीत नाहीं. "

" कां ? "

" मनुष्य यत्नपूर्वक शब्दांची जुळवणूक करूनही रसनिर्मिति करूं शकतो. पण तें कांहीं काव्य नव्हे. "

" असें कसें म्हणतां येईल ! "

" सांगतों. एखादा कुशल मूर्तिकार आपलें सगळें कौशल्य इरेस लावून एखाद्या मातेची आणि बालकाची अशी मूर्ति निर्माण करील, कीं ती पाहिल्याबरोबर मनुष्याचें अन्तःकरण वात्सल्यरसानें आर्द्र व्हावें. पण तो मूर्तिकार काय वाटेल तें करून ज्याप्रमाणें त्या मूर्तींत चैतन्य निर्माण करूं शकत नाहीं, नेमकें तसें काव्याचें आहे. "

" म्हणजे आपल्या म्हणण्याप्रमाणें प्रयत्नपूर्वक केलेलें तें काव्यच नव्हे ? "

" नव्हे. तें आपल्या चमत्कृतीनें मनुष्यास मोहित करील, कदाचित् त्याची रचना पाहून मनुष्य त्याकडे आश्चर्यानें पाहीलही. पण मनुष्याच्या अन्तःकरणास निरन्तर रससागरांत अवगाहन करायला लावायचें सामर्थ्य त्यांत नाहीं. "

" मग आपली व्याख्या सांगा ना ? "

" अन्तस्फूर्तिजन्यं, प्रसादयुक्तं रसात्मकं ही माझी व्याख्या. "

पण ही काव्यचर्चा अधिक वेळ चालू देणें नियतीला इष्ट वाटलें नाहीं. त्वरित एक स्वार दौडत तिथें येऊन उपस्थित झाला. अश्वावरून उतरून धांवत धांवत महाराजांकडे जाऊन तो प्रणाम करून म्हणाला, " सम्राट ! आपले मातुल संग्रामसेनजी—"

" काय झालें ? "

" घोड्यावरून पडून—"

" अरे सांग ना ! "

" परवां सायंकाळीं देहान्त झाला ! "

सगळ्या काव्यचर्चेवर पाणी पडलें. सम्राट् खिन्न होऊन म्हणाले, " पंडित जयदेव, देवाच्या मनीं काय असतें पहा ! आम्हीं निघतांना मोठ्या हौशीनें आमच्या मामींना आमच्या बरोबर आणलें. मामा नको म्हणत होते, पण मामींचा आग्रह पाहून आम्हीं देवदर्शन घडेल, या हेतूनें आम्ही त्यांना घेऊन आलों. मामांचा निषेधही मानला नाहीं. मामांचें फार प्रेम आम्हांवर ! आतां त्या माउलीला काय म्हणून समजवावें ? आपण तरी चला आम्हांबरोबर ! "

" आपण पुढें व्हावें महाराज ! मी पद्मेला घेऊन येतों. स्त्रियांची समजूत काढायला स्त्रीच अधिक उपयोगी ठरेल. "

" आम्ही आपली वाट पहातों "

" आम्ही दोघें लगेच निघालों. "

सम्राट खिन्न अंतःकरणानें निघाले.

जयदेवानें पद्मेला तें वृत्त सांगितलें, आणि म्हणाला, " तुझी तिथें आवश्यकता आहे. "

" चलावें. "

तीं दोघे ज्या वेळीं प्रासादांत जाऊन पोंचलीं, तेव्हां सबंध प्रासादांत खिन्नता पसरली होती. महाराजांची मामी तर धाय मोकलून रडत होती. मांडवीदेवीही खिन्न होत्या. महाराज जयदेवांस म्हणाले, " पण्डित जयदेव ! मामी, सती जायेय् ! ती म्हणत्ये, आतां मी जगून काय करूं ? मला दुसरें कोण आहे ! "

सती जाण्याची सिद्धता मोठ्या जोरानें चालली होती. कांहीं सुवासिनींनीं मामीचा मळवट भरला. नंतर तिच्या पुढें नानाप्रकारचे अलंकार आणून ठेवले गेले. ते सर्व अलंकार तिनें सतीचें वाण, म्हणून सौभाग्यवती स्त्रियांस वाटून टाकले.

शेवटीं तिनें आपल्या गळ्यातील मंगलसूत्र काढलें व तें हातीं घेऊन ती म्हणाली, " मांडवी, हें कोणास देऊ ? "

" आपणास इष्ट वाटेल तिला द्या. "

मामींनें सर्व स्त्रीसमुदायाकडे आपली अश्रूंनीं भरलेली दृष्टि फिरविली. नंतर तिनें विचारलें,

" हें सतीचें वाण कोण घेईल ? "

मंगलसूत्राचें वाण स्वीकारणें, म्हणजे मोठें आव्हानच होतें. सर्व स्त्रिया एकमेकींकडे बघूं लागल्या. तों त्या सगळ्या स्त्रियांतून पद्मा पुढें आली. तिनें मामींना नमस्कार केला, आणि म्हणाली, " तें दान मला द्यावें ! "

पद्मेची सुंदर मुद्रा आणि लहान वय पाहून मामींनीं पुढें केलेला हात मागें घेतला. त्या म्हणाल्या,

" बाळ मी तुला ओळखलें. जयदेवांची पत्नी तूं. पण तूं अजून लहान आहेस. अजून तुम्हा दोघांना पुष्कळ वर्षें जगायचें आहे. सतीचें हें वाण तूं कशाला घेत्येस ? "

पद्मा पुढें पसरलेला हात मागें न घेतां म्हणाली,

" लहान मुलीनें पातिव्रत्य धर्माचा स्वीकार करूं नये काय ? "

" हो हो ! अवश्य करावा. "

" तर मग आपण तें वाण मलाच द्यावें. "

मामींनीं निरुपाय होऊन तें मंगलसूत्र पद्मेच्या हातीं दिलें. पद्मेनें तें तिथेंच गळ्यांत घातलें. मांडवीदेवींच्या मनांत ही गोष्ट एखाद्या पक्ष्यास जिव्हारी लागलेल्या बाणाप्रमाणें जाऊन बसली. त्यांना असें वाटलें, कीं पद्मेनें आपण पतिव्रता आहोंत, अशी प्रतिज्ञा करून इतर सर्व स्त्रियांच्या पातिव्रत्यास कमीपणा आणला.

थोड्याच वेळांत सर्व मंडळी सतीस्थानाकडे निघाली. सम्राट कुलाची दहनभूमि प्रासादाच्या मागेंच सागरतटाकीं होती. त्या भूमींत सम्राट् लक्ष्मणसेनांच्या पूर्वजांच्या कांहीं समाधी बांधून ठेवलेल्या होत्या. सागराच्या साक्षीनें तटाकावरील वाळूंत चंदनाची भली थोरली चिता रचलेली होती. नानाप्रकारचीं सुगंधीं द्रव्यें त्या चितेंत घातलीं होतीं. आम्रपल्लवांच्या तोरणांनीं ती चिता सुशोभित केली होती.

नाना प्रकारच्या वाद्यांच्या गजरांत सतीची यात्रा चितेकडे वळली. मांडवीदेवींनीं मामींना धरून चालविलें होतें. त्यांच्यामागें सगळा स्त्री समुदाय

होता. स्त्रियांच्या मागून पुरुषवर्ग चालला होता. पुरुषांत अग्रभागीं सम्राट्, जयदेव, महंत इत्यादि मंडळी माना खालीं घालून चालली होती.

चितेजवळ पोंचल्यावर मामींनीं चितेची समंत्रक पूजा केली. पूजा आटोपल्यावर त्यांनीं हातीं तुपानें भिजविलेला भला मोठा पेटता काकडा घेतला आणि चितेला प्रदक्षिणा घातली. नंतर त्या चितेच्या प्रवेशमार्गाजवळ येऊन उभ्या राहिल्या. त्यांच्या दुसऱ्या हातांत पतीच्या पादुका होत्या.

रडत रडत सम्राट लक्ष्मणसेनांनीं मामींना नमस्कार केला. त्यांना पोटाशीं धरत मामी म्हणाल्या, "बेटा ! रडूं नकोस ! सतीला पोंचवितांना रडायचें नसतें."

"मामी ! दुःख सहन होत नाहीं !"

"तसेंच सहन करायचें !"

त्यानंतर सर्व पुषरुवर्गानें मामींना नमस्कार केला. महन्तांनीं मामींना नमस्कार केला. पुरुषांचें आटोपल्यावर सर्व स्त्रियांनीं चरणस्पर्शपूर्वक वंदन केलें. मांडवीदेवींना मामी म्हणाल्या, "मुली, लक्ष्मणाला दुःख होईल, असें कांहीं करूं नकोस !"

पद्मेनें जेव्हां मामींच्या पायांस स्पर्श केला, तेव्हां मामींनीं तिला जवळ घेऊन म्हटलें, "बेटी ! तूं आदर्श पतिव्रता होशील, असा माझा आशीर्वाद आहे !"

शेवटीं मामी पद्मेच्या हाताचा आश्रय घेऊन चितेवर चढल्या. वाद्यांचा गजर सुरू झाला. चितेच्या वर आणि चहूंबाजूंनीं सहज पेट घेईल, असें जळण व गवत ठेवलें होतें. मामींनीं गवताला काकडा लावतांक्षणींच चिता भडकली.

पहातां पहातां चौं दिशांनीं अग्नीच्या ज्वाळा आपल्या जिभा वेळावीत त्या चितेचा ग्रास करूं लागल्या. वाद्यांचा गजर, आणि स्त्रियांचीं गाणीं सुरूच होतीं.

एका घटकेंत चिता शांत होत चालली. सगळी मंडळी साश्रु नयनांनीं प्रासादांत परतली. शिष्टाचार म्हणून, मांडवीदेवींना प्रासादांत पोंचविण्याकरितां पद्मा त्यांच्या बरोबर तेथपर्यंत गेली.

ती जेव्हां मांडवीदेवींना विचारून जाण्यास निघाली, तेव्हां मांडवीदेवींच्या मनांतलें शल्य उमळून वर आलें. त्या म्हणाल्या, "पद्मादेवी !"

"काय ?"

"जरा थांबा."

पद्मा थांबली. राजमहिषींच्या स्वरांत झालेला बदल तिला जाणवला. ती त्या बदलाकडे लक्ष न देतां थोड्या वेळानें म्हणाली, " काय आज्ञा आहे ? "

" आजचा हा प्रसंग कसा काय झाला ? "

" मला आपला प्रश्न उमगला नाहीं. "

" न उमगण्याजोगें त्यांत कांहीं नाहीं. मामींच्या सती जाण्याविषयीं आपलें काय मत आहे ? "

" मत काय असायचें ? त्या मोठ्या पतिव्रता होत्या. "

" त्यांच्या पातिव्रत्याविषयीं मला तुमचें मत नको आहे. "

" मग आपली काय इच्छा आहे ? "

राजमहिषींच्या नेत्रांत हिंस्रता चमकून गेली. आपला ओंठ दाबीत त्या म्हणाल्या, " नव्हे, मी म्हणत होत्यें—"

" काय ? "

" तुमच्यावर जर हा प्रसंग आला, तर तुम्ही काय कराल ? तुमचें हें सुंदर शरीर—"

पद्मेचें मुख काळेंठिक्कर पडलें. ती जणूं काय संवेदनाशून्यच झाली. सम्राज्ञींना व्याधानें बाण मारलेल्या हरिणीप्रमाणें पद्मेची ती अवस्था झालेली पाहून मोठें बरें वाटलें. त्या आणखी एक आघात करण्याच्या हेतूनें म्हणाल्या, " तुमचें हें सुंदर शरीर तुमच्याच्यानें असें जाळून घेववेल ? अशा लहान वयांत पतिनिधनानंतर जिवंत रहायचा मोह तुमच्या मनांत निर्माण होणार नाहीं ? "

पद्मा हळूं हळूं भानावर आली. तिची मुद्रा उजळ दिसूं लागली. निर्धाराचें अपूर्व तेज तिच्या मुखावर पसरून तें मुखकमल अधिकच तेजस्वी भासूं लागलें. ती शांत, संयमी स्वरांत म्हणाली, " सम्राज्ञी ! ती वेळ जर माझ्या दुर्दैवानें आली, तर काय होईल तें ऐका. "

" काय होईल ? "

" मजवर हा समारंभ करविण्याची पाळीच येणार नाहीं ! "

" मग ? "

" ज्या क्षणीं ती अमंगल वार्ता या कानीं पडेल—"

" काय ? "

" त्या क्षणीं प्राण हे शरीर सोडून निघून जातील ! "

मांडवीदेवींचें मुख काजळी पोतल्याप्रमाणें भासूं लागलें. त्यांच्याकडे लक्ष न देतां पद्मा पुढें म्हणाली, " आणि या सुंदर शरिराविषयीं आपण विचारलेंत, तें ऐकावें. "

" काय ? " ओढलेल्या स्वरांत मांडवीदेवी म्हणाल्या.

" हें शरीर ज्या क्षणीं त्यांचें झालें, त्या क्षणापासूनच हें निर्माल्य झालें. हें आतां कोणाच्याही उपयोगाचें राहिलें नाहीं. त्यांच्याबरोबरच नष्ट व्हायचें हें ! येत्यें आतां ! "

पद्मा लगेच निघाली. मांडवीदेवी एकाद्या काठीचा तडाखा खाल्लेल्या नागाप्रमाणें फुसकारे सोडीत बसून राहिल्या.

सम्राज्ञींशी झालेलें हें संभाषण पद्मेनें जयदेवास सांगितलें नाहीं.

दुसरे दिवशीं सायंकाळीं राजदूत पाठशाळेंत आला, आणि जयदेवास प्रणाम करून म्हणाला, " सम्राट् आपलें स्मरण करीत आहेत. "

" चल, येतों. "

थोड्याच वेळांत जयदेव प्रासादांत उपस्थित झाला. त्याला उत्थापन देत सम्राट् म्हणाले, " पंडितश्रेष्ठ, आम्ही आतुरतेनें आपली वाट पहात आहोंत. "

" काय आज्ञा आहे ? "

" मामांच्या निधनानें हें दुःख आम्हांस अगदीं असह्य झालें आहे. "

" दुःख होणें अगदीं स्वाभाविक आहे. पण विवेक हा अशा संकटांच्या काळांतला मानवाचा मित्र आहे. "

" आम्ही एक योजना करीत आहोंत. "

" काय ? "

" या दुःखाचा विसर पडण्याकरितां इथून पंधरा कोसांवर असलेल्या वनांत मृगयेला जायचें. आठ दिवसांत परत फिरूं. "

" योजना चांगली आहे. असेंच कांहीं तरी करून दुःखाचा विसर पाडला पाहिजे. "

" पण आपला केवळ आशीर्वाद नको ! "

" मग ? "

" सहयोग पाहिजे. "

जयदेव किंचित् स्मित करून म्हणाला, " मृगयेच्या कामीं मजसारखा ब्राह्मण आपल्या कांहींहीं कामाचा नाहीं. "

" मृगयेंत आम्हांला आपल्या सहाय्याची अपेक्षा नाहीं. "

" मग ? "

" आपला रम्य सहवास आम्हांस दुःखाचा विसर पाडण्यास परम सहाय्यक होईल. आपल्याशीं काव्यशास्त्रविनोद करीत आम्ही या आठ दिवसांत परत एकदां पूर्ववत् होऊन पुरीस येऊं, असा आम्हांस विश्वास आहे. आपण आम्हांस उपकृत कराल, अशी आशा बाळगून आहोंत आम्ही."

सम्राटांच्या या सयुक्तिक इच्छेस मान देऊन जयदेव म्हणाला, " जशी सम्राटांची इच्छा. केव्हां निघायचें ? "

" परवां प्रभातकाळीं. "

जयदेव परत घरीं आला. तो पाठशाळेच्या आवारांत, " इकोयणचि " च्या अर्थाशीं झगडत बसलेल्या बलदेवास म्हणाला, " बलदेव पंडित !"

" काय गुरुदेव ? "

" मी परवां आठ दिवसांकरितां बाहेर जात आहे. तूं हे आठ दिवस पद्मेला सोबत करून घर सांभाळशील ना ? "

" आज्ञाप्रामाण्य आहे. पण पाठशाळेंत अध्यापनकलेचें प्रदर्शन कोण करील ? "

" तोंपर्यंत पद्मा कांहीं विद्यार्थ्यांना शिकवील. बाकीचे स्वाध्याय करतील."

रात्रीं जेवायला बसल्यावर तो पद्मेला म्हणाला, " पद्मे, तुला परवांपासून आठ दिवस एकटें रहावें लागणार. "

छातींत एकदम धस्स होऊन पद्मा जागच्या जागींच उभी राहिली. थोड्या वेळानें ती म्हणाली, " कां ? "

" घाबरलीस कीं काय ? घाबरायचें कांहीं कारण नाहीं. "

" आपण कुठें जाणार आहांत ? "

" सम्राट् या मातुलनिधनाच्या दुःखाचा परिहार होण्याकरितां मृगयेस जात आहेत. त्यांनीं आग्रह केल्यावरून मीहि त्यांच्या बरोबर जात आहें. चिन्ता करूं नकोस. सोबतीला बलदेव आहेच. प्रारंभिक विद्यार्थ्यांस तूं पाठ देत जा. बाकीच्यांस स्वाध्याय करायला सांग. मग जाऊं ना मी ? "

अस्फुट स्वरांत पद्मा म्हणाली, " जावें. "

रात्रीं पहिली झोंप झाल्यावर जयदेव अवचित जागा झाला. त्याला असें वाटलें, कीं कोणीतरी आपले पाय भिजवून टाकीत आहे. तो पटकन् उठून बसला, तो त्यास आढळून आलें, कीं पद्मा आपल्या पायांवर डोकें ठेऊन रडत आहे !

त्यानें पद्मेला आपल्या बाहुपाशांत घेतलें, आणि तिच्या नेत्रांतील आंसवें पुशीत स्नेहार्द्र स्वरानें तो म्हणाला, " कां ग ? "

" उगीच. " उत्तर आलें.

जयदेवानें पद्मेला अधिकच जवळ घेऊन तिचें एक चुंबन घेतलें.

* * *

## बारा

आपल्या प्रासादाच्या पिछाडीस सम्राज्ञी एका सैनिकाशीं कांहीं हितगुज करीत होत्या.

सायंकाळची वेळ टळून गेली होती. त्या अंधुक प्रकाशांत त्या दोघांच्या मुद्रा जरी नीट दिसूं शकत नव्हत्या, तरी जें काय दिसत होतें, त्यावरून त्यांच्या हितगुजाचा विषय कांहीं मोठा भद्र नव्हता, एवढी गोष्ट खरी.

" काम कळलें ना सगळें ? "

" होय. "

" वेळ लक्षांत आहे ना ? "

" होय. "

" तो जें अंगवस्त्र पांघरून गेला, त्याच जातीचें अंगवस्त्र मिळविशील ना ?"

" होय. तें अंगवस्त्र मिळणें कांहीं फारसें कठीण नाहीं. जरी तें अंगवस्त्र वापरण्याचा प्रघात नवद्वीपाकडे असला, तरी इथेंहि तसलें अंगवस्त्र वापरणारे अनेक लोक भेटतील. "

" छान ! तूं बुद्धिमान आहेस. जागा लक्षांत आहे ना ? राजसभेच्या शेजारील महाल. "

" होय सम्राज्ञी. "

" पहा ! नाटक सुंदर वठलें पाहिजे ! "

" सम्राज्ञींनीं एक वेळ दासाची परीक्षा पहावीच. "

" ठीक आहे. तुझ्या कामाबद्दल योग्य तें मूल्य तुला मिळेल. "

प्रणाम करून सैनिक मागें फिरला. सम्राज्ञी त्याच विचाराच्या गुंगींत आपल्या महालांत येऊन असनावर बसल्या. ओठ चावीत त्या पुटपुटल्या, " उद्यां पहातें तुझी परीक्षा ! "

दुसरे दिवशीं सकाळीं एक दूती पाठशाळेंत जाऊन पोहोंचली.

जयदेवास जाऊन आज पांचवा दिवस. हे पांच दिवस पद्मेनें कसे तरी लोटले. कधीं कधीं तिला वाटे, असेंच धांवत धांवत त्या मृगयावनांत यावें आणि हे सकुशल आहेत कीं नाहीं, तें पाहून परत यावें. पण एक तर ती गोष्ट

अशक्य होती; आणि दुसरें, जयदेवानें तिला सांगितलेलें काम तिला पार पाडावयाचें होतें.

दिवसभर ती पाठशाळेंतील विद्यार्थ्यांस पाठ देत असे. सायंकाळीं जेवणें तिनें सोडून दिलें होतें. रात्रीं ती आपल्या अंथरुणावरील उशी भिजवीत पडून राही. दुसरा दिवस उगवे.

आजही नित्यनियमाप्रमाणें ती उठली, आणि स्नान उरकून नुकतीच स्वयंपाकाच्या सिद्धतेस लागण्याविषयीं बलदेवास सूचना देत होती, तों राजदूती आलेली तिनें पाहिली.

" काय ग ? "

" सम्राज्ञींनीं आतांच आपली आठवण केली आहे. असाल तशा येऊन जायची प्रार्थना केली आहे. " दूती प्रमाण करून म्हणाली.

" येत्यें म्हणून सांग. "

दूती परत गेली. थोड्या वेळानें पद्मा प्रासादाकडे निघाली. वाटेनें चालतांना ती विचार करूं लागली, " असें तांतडीचें काय काम असेल ? कदाचित् या चारसहा दिवसांत गेल्यें नाहीं, म्हणून बोलाविलें असेल. मी चुकल्येंच. त्यांचें सांत्वन करण्यासाठीं एकदां जाऊन यावयास पाहिजे होतें."

झपझप पावलें टाकीत सरलहृदया पद्मा प्रासादांत जाऊन पोंचली. दासींनीं सांगितलें, "सम्राज्ञी राजसभेच्या शेजारील महालांत आपली वाट पहात आहेत."

पद्मेनें त्या महालांत प्रवेश करतांच सम्राज्ञी म्हणाल्या, " यावें पद्मादेवी !"

आसनावर बसत पद्मा म्हणाली, " माझी कां आठवण केली होती ? "

" सासूबाई जाऊन आज सहा दिवस झाले. एवढे दिवसांत आपण आलां नाहींत ! सगळा गांव येऊन गेला. "

संकोचून जाऊन पद्मा म्हणाली, " सम्राज्ञींनीं क्षमा करावी. व्यग्रतेमुळें माझ्या लक्षांतच आलें नाहीं. "

" कसली व्यग्रता ? "

अधिकच संकोच पावत पद्मा म्हणाली, " व्यग्रता तरी कशाची ? कामेंच अधिक होतीं. "

सम्राज्ञी खोंचून म्हणाल्या, " पद्मादेवी, आपण व्यर्थ लपवालपवी करीत आहांत. पण्डित जयदेव यांच्याबरोबर मृगयेस गेले आहेत, म्हणून एवढें

व्यग्र व्हावें लागतें ? नैमित्तिक कार्यांचा विसर पडण्याइतकें ? ”

पद्मेनें उत्तर दिलें नाहीं. ती तशीच खालीं मान घालून बसून राहिली.

थोड्या वेळानें सम्राज्ञी म्हणाल्या,

“ पद्मादेवी, या तुमच्या जगावेगळ्या प्रेमाची रीत तरी मला सांगा ! मीहि त्याचें अनुष्ठान करून पाहीन ! ” पद्मा सांवरून म्हणाली, “ सम्राज्ञी मला उगीच लाजवीत आहेत. ”

“ लाजवीत आहें ? चांगलें ! उलट मजवरच आरोप कां हा ? पण मी म्हणतें, जयदेव कुठें परागंदा तर झाले नाहींत ना ? ते मृगयेस गेले आहेत, बरोबर साम्राज्याचा भार आपल्या स्कंधावर वाहाणारे सम्राट आहेत. मग एवढें व्यग्र व्हायचें कारण काय ? ”

पद्मेला तें अशुभ भाषण ऐकवलें नाहीं. ती काळवंडून जाऊन मान खालीं घालून बसून राहिली.

सम्राज्ञी पुढें म्हणाल्या, “ जाऊं द्या. तुम्हाला पश्चात्ताप होतोय्, असें मी समजून चालत्यें—”

तोंच बाहेर कोलाहाल ऐकूं आला. काय आहे, म्हणून सम्राज्ञी पृच्छा करण्याच्या विचारांत आहेत, तोंच एक दासी घाबऱ्या घाबऱ्या आंत आली, आणि सांगू लागली,

“ सम्राज्ञींचा विजय असो ! एक स्वार—! ”

“ विजयनाद मग करीत बैस ! अगोदर काय तें सांग ! ”

“ मृगयेस गेलेल्या स्वारांतून एक स्वार परत आला आहे ! तो लगेच आपलें दर्शन घेऊं म्हणतो ! ”

“ पाठवून दे. ”

चिंतित मुद्रा करून सम्राज्ञी महालाच्या दाराकडे जाऊं लागल्या. त्यांच्या मागोमाग मनीं किंतु उपजलेली पद्मा घाईघाईनें निघाली.

तोंच धुळीनें वस्त्रें माखलेला एक सैनिक धापा टाकीत आंत आला, आणि त्यानें सम्राज्ञींना साष्टांग प्रणाम केला.

“ काय रे ? सम्राट तर कुशल आहेत ना ? ”

“ होय सम्राज्ञी ! देहानें कुशल आहेत ! ”

“ मग ? ”

" मनानें अत्यंत दुःखी आहेत ! "

" कां रे ? "

" मित्रवियोगामुळें ! "

" काय झालें ? "

" एका महाप्रचंड व्याघ्रामागें आम्ही सगळे लागलों होतों. महाराज सर्वांत पुढें होते. त्यांनीं एक बाण व्याघ्राचा नेम धरून सोडला. त्या बाणानें व्याघ्राचा प्राणान्तच व्हायचा. पण दुर्दैवानें तो चुकला ! व्याघ्र मागें फिरला ! फार मोठा व्याघ्र होता सम्राज्ञी ! असा व्याघ्र—"

" वर्णन मग कर ! अगोदर काय झालें तें सांग. "

" सांगतों. त्यानें सरळ आम्हावर मोर्चा धरला. आम्ही सगळे दुतर्फा पांगलों, आणि त्या व्याघ्राच्या तडाख्यांत सांपडले बिचारे—" तो सैनिक थांबला.

" अरे सांगत कां नाहींस लवकर ! "

" सांगतों ! बिचारे पण्डित जयदेव ! "

वज्राघात झाल्याप्रमाणें मर्माहत झालेली पद्मा एक क्षण स्तब्ध उभी राहिली. दुसऱ्या क्षणीं खालीं कोसळतांना तिनें दाराचा आधार घेतला आणि ओढलेल्या आवाजांत त्या स्वाराला विचारलें, " पुढें काय झालें ? "

" काय व्हायचें पुढें ? " आपल्या दुपट्ट्यांतून एक अंगवस्त्र बाहेर काढीत तो स्वार पुढें म्हणाला, " हें त्यांचें अंगवस्त्र ! बिचाऱ्या ब्राह्मणाचें कांहींही अवशिष्ट ठेवलें नाहीं व्याघ्रानें ! "

धप्पकन् आवाज झाला !

सम्राज्ञी धांवतच पद्मेकडे गेल्या. त्यांनीं घाबरून जाऊन पद्मेचें मुख उचलून धरलें, आणि हांक मारली, " पद्मादेवी ! "

पण ओ देणारें चैतन्य केव्हांच आपल्या स्वरूपीं विलीन झालें होतें ! पतिनिधनाची वार्ता श्रवणीं पडतांक्षणींच त्या अत्यंत सुंदर शरीरांतील प्राण उडून गेले ! मागें राहिली ती केवळ माती !

भयानें सम्राज्ञींच्या अंगाचें पाणी पाणी झालें. त्यांनीं पद्मेची फजिती करण्याचे जे अनेक संकल्प करून ठेवले होते, ते ठिकच्या ठिकाणींच विरून गेले. त्याच्या हातावर हात मारून आपला पण खरा करीत पद्मा त्यांच्या पोहोंचेपलीकडे निघून गेली !

हें असें होईलशी सम्राज्ञींची कल्पना मुळींच नव्हती. म्हणून त्या अत्यंत घाबरून गेल्या. त्यांनीं वैद्याच्या नांवानें पुकारा करावयास प्रारंभ केला. आतां मात्र सर्व दासदासी आणि तो सैनिक हीहि मंडळी घाबरली. एकीनें धावत धांवत वैद्यास बोलावून आणलें.

पद्मेच्या शवाजवळ सम्राज्ञी भयानें विवर्ण होऊन बसल्या होत्या. वैद्य येतांच त्या त्याला म्हणाल्या,

" अहो वैद्यराज ! या स्त्रीला जिवंत करा ! तुम्हास काय लागेल तें देईन. "

मोठ्या आशेनें वैद्यानें पद्मेची नाडी आपल्या हाती घेतली. पण तिथें काय होतें ? सर्व शरीर काल्यासारखें थंड पडलें होतें.

नाकापाशीं सूत लावून पाहून वैद्य निराशेनें म्हणाला, " साम्रज्ञींचें हें काम दासाकडून व्हायचें नाहीं ! प्राण या देहास सोडून गेले ! "

तोंच बाहेर परत गलबला झाला. सम्राज्ञींनीं बाहेर पाहिलें.

सम्राट लक्ष्मणसेन जयदेवाबरोबर परत फिरले होते !

सम्राटांना या सर्व बनावाची कांहींच कल्पना नव्हती. ते जयदेवाशीं गप्पा मारीत राजसभेंत शिरले. शेजारच्या महालांत माणसांची धांवपळ पाहून ते तिकडे वळले. त्यांच्या पाठोपाठ जयदेवही आंत आला !

त्या दोघांनीं पाहिलें, कीं दारापाशींच पद्मेचें शव पडलें असून त्याच्या शेजारीं बसलेल्या सम्राज्ञींनीं आपलें मुख दोन्ही हातांनीं झांकून घेतलें आहे ! वैद्य, दास, दासी, तो सैनिक इत्यादि मंडळी भयानें विवर्ण होऊन आपापल्या जागीं खांबासारखीं उभी आहे !

धनुष्यापासून सुटलेल्या बाणाच्या वेगानें जयदेव एका क्षणांत एक किंकाळी फोडून पद्मेच्या शवाजवळ गेला. त्यानें तिचें मुख उचलून पटापट त्याचीं चुंबनें घेण्यास प्रारंभ केला. नंतर " पद्मे ! प्रिय सखि ! " अशा अत्यंत विव्हल हांका मारावयास प्रारंभ केला.

सम्राज्ञी धांवत जाऊन सम्राटांच्या पायांवर पडून कांहीं न बोलतां रडूं लागल्या. महाराजांस हा सर्व प्रकार काय आहे, याचा बोध होईना.

तोंच तो धुळीनें माखलेला सैनिक प्राण घेऊन पळूं लागला. सम्राट तें पाहून ओरडले, " तो कां पळतो रे ? त्याला धरा ! जाऊं देऊं नका ! "

त्वरित तीनचार सैनिकांनीं त्याचा पाठलाग केला, आणि त्याला धरून

सम्राटांसमोर आणलें.

तो लोटांगण घालीत लोळत रडूं लागला, आणि बोबडी वळल्याप्रमाणें बोलला, " मी निरपराध आहें स्वामी ! मला जीवदान द्या ! "

सम्राट संतापून म्हणाले, " त्याला धरून उभा करा ! काय झालें, तें सगळें सांग ! सगळें सांगितलेंस तर तुला क्षमा करीन ! नाहींतर आतांच तुझा शिरच्छेद करीन ! "

तो घाबरून जाऊन म्हणाला, " मला सम्राज्ञींनीं तसें सांगावयास सांगितलें ! "

" तसें म्हणजे कसें ? "

" त्या मला म्हणाल्या, तूं धुळीनें कपडे भरव, आणि धांवत येऊन जयदेव पण्डितांना व्याघ्रानें खाल्लें असें सांग ! "

सम्राटांच्या पुढें प्रकाश निर्माण होत चालला. सम्राज्ञीकडे संतापानें पहात ते म्हणाले, " मग ? "

" त्यांनीं मला या पद्मादेवी इथें असतांना ही वार्ता सांगावयास सांगितली. "

" मग काय झालें ? "

" मीं ही वार्ता त्यांच्या आज्ञेप्रमाणें सांगितली. पद्मादेवींनीं ती ऐकली; आणि तत्क्षणीं खालीं कोसळल्या ! "

शेजारींच उभ्या असलेल्या वैद्याकडे महाराजांनीं दृष्टि फिरविली. त्यानें खालच्या मानेनेंच उत्तर दिलें, " प्राण जाऊन अर्ध घटिका होत आली आहे ! "

सम्राट मांडवीदेवीपासून दूर झाले, आणि त्यांना जळत्या शब्दांत म्हणाले, " उठा ! उभ्या रहा ! "

ते शब्द ऐकून मांडवीदेवींना अधिक रडायचें साहस झालें नाहीं. त्या उठून उभ्या राहिल्या.

डोळ्यांतून ठिणग्या बाहेर फेंकीत सम्राट् म्हणाले, " हें कां केलेंत ? "

" महाराज, मला यांची ओळख पटली नाहीं ! या एकदां म्हणाल्या होत्या, कीं पतिनिधनाची वार्ता कानीं पडतांक्षणींच मी प्राण सोडीन ! यांची परीक्षा पाहूं गेले मी ! "

" कां ? असूया निर्माण झाली म्हणून ? आम्हाविषयींच्या नानाप्रकारच्या शंकाकुशंका घेत आतल्या आंत जळत होतांत ! या बिचाऱ्या सुशील ब्राह्मण

युगुलाचें आपापसांतील प्रेम तुमच्याच्यानें बघवलें नाहीं ? तुम्हीं एक अत्यंत मौल्यवान् जीवित कुस्करून टाकलें आहे ! वस्तुतः तुमचाही शिरच्छेद केला पाहिजे ! पण आजोबांचा संकेत असा आहे कीं, या राज्यांत स्त्री अवध्या आहे ! उद्यां सकाळीं तुम्ही या राज्यांत न दिसलां पाहिजेत ! ”

सम्राट् जयदेवाकडे वळले. एखाद्या पाषाणप्रतिमेप्रमाणें जयदेव पद्मेचें शरीर मांडीवर घेऊन बसला होता. त्यांनीं त्याच्या खांद्यावर हात ठेवला, आणि सद्गदित होऊन म्हणाले, “ प्रिय सुहृद, मी काय बोलून तुमचें समाधान करूं ? चला आतां ! पद्मादेवींचा अन्त्यसंस्कार आमच्या दहनभूमीवर होईल ! उठा ! ”

जयदेव वेड्यासारखा बोलला, “ उठूं ? कां ? ”

“ मृत देहास कुठवर धरून ठेवणार ? ”

“ कोण मृत झालें आहे ? ही पद्मा ? नाहीं ! ही तर केवळ झोंपली आहे ! परवांच तर रात्रीं ही माझ्या कुशींत शिरून मला म्हणाली, ‘–कीं आतां लवकरच आपलें बाळ जन्मास येणार आहे !–’ ही कशी मरेल ? सम्राट्, आपण असें अभद्र काय बोलतां ? ”

तर मग पद्मा गर्भवती होती ! सम्राटांच्या नेत्रांत पटकन् पाणी उभें राहिलें. तोंच पद्मेचें प्रेत उचलून जयदेव उभा राहिला, आणि उन्मत्तासारखा बाहेर पळत सुटला !

हां हां म्हणतां ही वार्ता सबंध पुरींत पसरली.

लोकांचा विश्वासच बसेना.

पद्मादेवी मरण पावली ?

आपली अत्यंत आवडती पद्मादेवी ?

जयदेवाची एकनिष्ठ अनुगामिनी ?

ती अत्यद्भुत गानदेवता ?

ज्या वेळीं जयदेवाच्या शिष्यवर्गानें ही वार्ता ऐकली, तेव्हां अन्तःकरणाचा ठाव सुटून ते सगळे राजप्रासादाकडे धांवत सुटले. त्यांच्या पाठोपाठ गांवांतले उपाध्याय, क्षत्रिय, वैश्य, शूद्र, श्रमिक, कृषिक, चर्मकार, सुवर्णकार, सारथी, कलाल, कुलाल स्त्रिया, पोरी, पोरें, हीं सगळीं लाजलज्जा सोडून धांवत निघालीं.

आपली पद्मादेवी मृत झाली ?

तिच्या मरणास सम्राज्ञी कारण झाल्या?

यांनीं तिला जयदेवाच्या मृत्यूची खोटीच वार्ता ऐकविली?

तत्क्षणीं तिनें शरीरपात केला?

अहाहा! धन्य तिचें पतिप्रेम! धन्य पातिव्रत्य!

कांहीं चिकित्सक म्हणाले, "पतिनिधनाची वार्ता ऐकतांक्षणींच कां मेली? ती वार्ता खरी कीं खोटी हें समजून घ्यायला नको होतें? आणि कांहीं विषबाधा झाली असेल, म्हणून एवढ्या लवकर मरण पावली. नाहींतर अनेक स्त्रिया पतिनिधनाची वार्ता ऐकतात. त्या कुठें मरत नाहीत त्या?"

पण असे कुतार्किक अगदींच कमी होते. त्यांच्याकडे दुर्लक्ष करून लोक आपल्या प्रियदर्शिनीचें दर्शन घेण्यास धांवत चालले.

तोंच वार्ता आली, की पद्मा गरोदर होती!

हरि हरि! सम्राज्ञीच्या दुष्टपणास काय म्हणावें?

कुलटेनें सगर्भा पद्मेला मारून टाकलें!

अहाहा! आमची पद्मा! अत्यंत सुशील पद्मा! प्रियवादिनी पद्मा! कर्पूरगौरा पद्मा! अत्यंत सुंदर पद्मा!—तर मग ती गर्भवती होती!

क्षुब्ध लोकांचा समूह खवळत, उन्मत्त होत प्रासादाकडे धांवत सुटला. त्यांच्यासमोर जर या खेपेस सम्राज्ञी येती तर—

तर त्यांनीं राजक्षोभाची चिंता न करतां तिचा वध केला असता! दगडांनीं ठेंचून तिला मारून टाकलें असतें!

तो समूह वाड्याकडे पळत सुटला.

रडत, ओरडत, शिव्या देत.

तों त्याला समोरून जयदेव पद्मेचें शव हातीं घेऊन धांवत येतांना दिसला!

त्याच्या मागोमाग सम्राट् आणि त्यांचा परिवार धांवत होते!

हा समूह जागच्या जागीं थबकला.

त्याला पाहून सम्राटांस पद्मेच्या आणि जयदेवाच्या अपूर्व लोकप्रियतेची कल्पना आली! पण आतां कांहीं उपाय नव्हता! हातून बाण सुटला गेला होता!

हा एवढा जनसागर समोर उभा खरा, पण जयदेवाचें लक्ष तिकडे मुळींच गेलें नाहीं. तो आपल्या जिवलग सखीला हांका मारीत मन्दिराकडे पळत होता.

लोकसमुदायरूप यमुना दुभंग झाली ! सर्वांनीं जयदेवास मार्ग दिला. त्याचा तो उन्मत्त भावावेश पाहून कोणाचेंही त्याच्याशीं बोलायचें साहस झालें नाहीं.

त्यांनीं त्यांची प्रियदर्शिनी पद्मा पाहिली !

अहा ! ती झोंपलेलीच तर दिसत होती !

मुखावर मृत्यूमुळें यत्किंचित्‌हि विकृति निर्माण झाली नव्हती !

तें प्रफुल्लोत्पलाप्रमाणें भासणारें मुख अजूनहि विवर्ण झालें नव्हतें !

पण तिला घेऊन जयदेव कुठें निघाला ?

कुणाचें विचारायचें साहस होईना !

सगळे जयदेवाच्या मागें निघाले. एवढा मोठा जनसमुदाय, पण अत्यंत शांत ! कुणीही मुखांतून एक शब्द काढीना !

शेवटीं जयदेव जगन्नाथाच्या मन्दिराकडे वळून मन्दिरांत जाऊन पोंचला. तिथें गेल्यावर त्यानें आपल्या प्रिय सखीचें तें शव गाभाऱ्याच्या दारांत ठेवलें आणि तिला हांका मारीत व तिचीं चुंबनें घेत तो तिच्या शेजारीं बसला.

महन्त येऊन उपस्थित झाले. तें करुण दृश्य पाहून त्या स्थितप्रज्ञ महन्तांच्याहि नेत्रांतून दोन आंसवें खालीं ओघळलीं.

महन्तांच्या शेजारीं एखाद्या अपराध्याप्रमाणें मान खालीं घालून सम्राट् उभे होते. त्यांच्या मागें जनतासागर अनिमिष नेत्रांनीं आतां काय होणार याची वाट पहात होता.

एकदम जयदेव उठला. तो म्हणाला, " अरे ! सखि, आतां तुझ्या कृतक कोपाचें कारण कळलें !

" परवां आठ दिवसांपूर्वीं तूं मला म्हणाली होतीस, कीं, मी तुमचें भजन ऐकूं इच्छितें ! मला तसे डोहाळे होताहेत !

" त्याकरतां रुसलीस होय ?

" सखि ऐक माझें भजन ! "

जयदेव उन्मत्त होऊन गाऊं लागला.

**चन्दनचर्चित नीलकलेवर पीत वसन वनमाली।**
**केलिचलन्मणि कुण्डल मण्डित गण्डयुगः स्मितशाली ॥**

तो गात होता. त्याचा स्वर कंपित होऊन सभामंडपाच्या भिंतींची मर्यादा सोडून पलीकडे जाऊं लागला. त्या स्वरांत पाषाणाला पाझर फोडणारी आर्तता होती. त्या स्वरांत वज्रांतून पाणी ठिबकविणारा करुण रस सांठवलेला होता.

जयदेव गातच होता. तें पद संपलें. त्याच्या मुखांतून दुसरें सहजस्फूर्त पद्य बाहेर पडलें.

तो परमेश्वराच्या अष्टावतारांचें गीत गाऊं लागला.

गातां गातां त्याच्या नेत्रांतून आंसवें वाहूं लागलीं.

" प्रभो ! त्या चिमण्या लहानग्या प्रल्हादाकरितां तूं नरहरिरूप धरलेंस ! विचित्र रूप ! अर्धा मनुष्य, अर्धा पशु ! पण आपल्या त्या भक्तश्रेष्ठाकरितां तूं तेंही कौतुक केलेंस !

**तव करकमलवरे नखमद्‌भुतशृंगं ।**
**दलित हिरण्यकशिपुतनुभृंगं ।**
**केशव धृत नरहरिरूप । जय जगदीश हरे ॥ "**

गातां गातां त्याचा स्वर इतका चढला, कीं लोकांना वाटलें, आतां हा स्वर फुटणार ! त्यांतली आर्तता लोकांचीं मनें व्यापून राहिली.

जयदेव थांबला. तो रडूं लागला. पद्मेजवळ जाऊन तो म्हणाला,

" पद्मे ! सखि ! आतां गाववत नाहीं ! शक्ति संपत चालली ! कालपासून भुकेला आहें ग ! मृगया लवकर संपवून तुझ्या भेटीच्या लालसेनें धांवत धांवत आलों ! आतां गाववत नाहीं ! स्वर तोकडा पडला ! सखि ! ऊठ ग ! भजनांत अंतराय निर्माण होतो ! पद्मे ग ! "

आणि अकस्मात् लोकांनीं पाहिलें कीं—

पद्मेच्या शरीरांत प्राण संचरूं लागला ! ती श्वासोच्छ्वास करूं लागली ! एका निमिषांत ती उठून बसली आणि जयदेव म्हणत असलेलें गीत ती आपल्या अत्यद्‌भुत स्वरांत गाऊं लागली !

**तव करकमलवरे नखमद्‌भुतशृंगं**
**दलित हिरण्यकशिपुतनुभृंगं**

लोक आनंदानें उन्मत्त झाले ! ते गर्जना करूं लागले, " जय जयदेव ! जय पद्मादेवी ! "

महंत पुढें झाले. त्यांच्या नेत्रांतून आनंदाश्रु वहात होते. त्यांनीं एका कुशींत जयदेवाला घेतलें, दुसऱ्या कुशींत पद्मेला. ते म्हणाले,

"धन्य जयदेव! धन्य पद्मा! जोंपर्यंत जगन्नाथमूर्ति आहे, तोंपर्यंत तुमचें नांव लोक विसरणार नाहींत!"

पुनः एकदां लोक गर्जले, "जय जयदेव! जय पद्मादेवी!"

★ ★ ★